






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

**मराठी अभ्यास परिषद पत्रिका** भाषा आणि जीवन

संपादक : प्र०ना० परांजपे, C-216 अथश्री, पॅनकार्ड क्लब रस्ता, धनकुडे वस्ती, बाणेर, पुणे 411 045. चलभाष : 94225 09638. ई-पत्ता : pranaparanjpe@gmail.com.

संपादन-समिती : विजय पाध्ये, आनन्द काटीकर, विजया चौधरी, सरोजा भाटे, सलील वाघ.

मराठी अभ्यास परिषद पत्रिका 'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक मालक, मराठी अभ्यास परिषद ह्यांच्यासाठी, मुद्रक व प्रकाशक आनन्द काटीकर ह्यांनी विनायक एन्टरप्रायजेस, 517 कसबा पेठ, पुणे 411 011 येथे छापून B-5/16 सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे 411 051 येथे प्रसिद्ध केले.

| **वार्षिक वर्गणी** | **एक वर्ष** | **तीन वर्षे** | **पाच वर्षे** |
|---|---|---|---|
| व्यक्तींसाठी | ₹१५०/- | ₹४००/- | ₹७००/- |
| संस्थांसाठी | ₹२००/- | ₹५५०/- | ₹९००/- |

सुट्या अंकाची किंमत ₹४०/-. कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.

मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹२०००/- + नोंदणी शुल्क ₹१००/-. आजीव सदस्यांना पत्रिकेचा अंक पाठवला जातो.

वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, थेट (ऑनलाईन) भरणा करून (बँक ऑफ महाराष्ट्र, टिळक रस्ता शाखा, पुणे; बचत खाते क्र० 20057164260; IFS Code MAHB0000041) देता येईल. धनादेशाने द्यायची असल्यास धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' ह्या नावाने काढावा. वर्गणीदारांनी कोणत्याही प्रकारे रकमेचा भरणा करताच परिषदेस पत्राने किंवा ई-पत्राने, किंवा 94203 22982 ह्या चलभाष क्रमांकावर लघुसंदेश किंवा व्हॉट्सअप संदेश पाठवून आपले नाव, टपाल-पत्ता, रक्कम, वर्गणी कोणत्या अंकापासून/वर्षापासून घ्यावी ते कार्यवाहीच्या प्रक्रियेसाठी कळवणे आवश्यक आहे.

जाहिरातींचे दर : पूर्ण पान ₹२,५००/-, अर्धे पान ₹१,५००/-, पाव पान ₹८००/-, शुभेच्छा ₹४००/-, आवरण पृष्ठ तीन ₹३०००/-.

प्रकाशन: त्रैमासिक; जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).

सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या मतांशी संपादक वा परिषद सहमत असतीलच असे नाही. (२) ह्या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र सहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि, ह्या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्यसंस्कृती मंडळ वा राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.

ह्या अंकाची किंमत ₹४०/-

## अनुक्रमणिका



### विशेष निवेदन

गेली दोन वर्षे टपालपत्ता बदलल्यामुळे आणि काही व्यवस्थापकीय अडचणींमुळे, मराठी अभ्यास परिषद पत्रिका 'भाषा आणि जीवन'चे अंक नियमितपणे निघू शकले नाहीत. प्रस्तुत अंकाची निर्मिती-प्रक्रियाही रोखली गेली होती व परिणामी तोही अतिशय विलंबाने (म्हणजे नोव्हेंबर २०१९मध्ये) प्रसिद्ध होत आहे, ह्याबद्दल क्षमस्व.

आगामी काळात, मागे पडलेले सारे अंक (कदाचित नेहमीपेक्षा कमी पानांचे) लागोपाठ प्रकाशित करण्याचा प्रयत्न करत आहोत. समृद्ध परंपरा असणाऱ्या आपल्या नियतकालिकाच्या नियमिततेत खंड पडणे योग्य नाही, ह्याची आम्हांला जाणीव आहे. २०१९ ह्या वर्षाच्या अखेरपर्यंत नियमानुसार सर्व अंक प्रकाशित होतील, असे प्रयत्न आम्ही करत आहोत. 'भाषा आणि जीवन'वरील आपला लोभ कायम ठेवावा ही सर्व वाचक, अभ्यासक आणि वर्गणीदार ह्यांना विनंती.

कार्यकारी मंडळ, मराठी अभ्यास परिषद

# मराठी : अभिजात भाषा?

**प्र०ना० परांजपे**

मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी गेली सुमारे दहा वर्षे प्रयत्न चालू आहेत. हे प्रयत्न अनेक पातळ्यांवर चालू आहेत. सरकारने त्यासाठी एक समिती नेमली. त्या समितीने मराठी भाषा अभिजात आहे असे सिद्ध करू पाहणारा एक अहवाल लिहिला. तो महाराष्ट्र शासनाने केंद्रशासनाकडे पाठवला. त्यात काही त्रुटी असल्यामुळे समितीने तो परत एकदा लिहिला आणि तोही (इंग्रजी भाषांतरासहित) केंद्राकडे पाठवण्यात आला. केंद्राने तो साहित्य अकादमीकडे अभिप्रायासाठी पाठवला. आणि असे ऐकिवात आहे की, साहित्य अकादमीने तो स्वीकारार्ह आहे असा अभिप्राय दिला. यालाही आता दोन-तीन वर्षे उलटली. पण मराठीच्या ललाटी अजून अभिजातपणाचे कुंकू लागलेले नाही. त्यासाठी मराठी साहित्यसंस्थांनी पंतप्रधानांना जनतेकडून पत्रे पाठवली, दिल्लीत आणि मुंबईत धरणे आंदोलने केली, मुख्यमंत्र्यांशी भेटीगाठी झाल्या. पण तरीही अद्यापी मराठीला अभिजातपणाचे कुंकू लागलेले नाही. आता तर असे ऐकिवात आहे की, अभिजातपणाच्या मुद्द्यावरून भाषांच्यामध्ये स्पर्धा निर्माण होते आणि भांडणे लागतात, असे दिसून आल्यामुळे यापुढे कुठल्याच भाषेला अभिजातपणाचा दर्जा द्यायचा नाही असे केंद्र शासनाने ठरवले आहे.

शिवाय अभिजातपणाचा दर्जा मिळालेल्या भाषांना काही विशेष लाभ झाला आहे किंवा त्यांच्यात काही विशेष प्रगती झाली आहे असे नाही, असे काही लोकांचे म्हणणे आहे. प्रथम तमीळ भाषेला अभिजात भाषा हा शिक्का मिळाला आणि त्यापोटी ५०० कोटी रुपये मिळाले. त्यानंतर लाजेकाजेस्तव संस्कृत भाषाही अभिजात भाषा आहे असे केंद्र शासनाने जाहीर केले. मग कन्नड, तेलुगु, मल्याळी या भाषांनी कंबर कसून प्रयत्न केले. खरे पाहता सोळाव्या शतकापर्यंत कन्नड आणि तेलुगु या भाषा भिन्न नव्हत्या. त्यामुळे कन्नड आणि तेलुगु भाषांचा स्वतंत्र इतिहास सोळाव्या शतकानंतर सुरू होतो. परंतु, तरीही त्यांनी आपल्या भाषा प्राचीन आहेत असे सिद्ध करून दाखवले! मल्ल्याळमनेही ते केले. आणि या भाषांच्या इतिहासामुळे नव्हे; तर या भाषा ज्या प्रदेशांत बोलल्या जातात त्या प्रदेशांच्या राज्यकर्त्यांच्या दबावामुळे, राजकारणामुळे त्या भाषांना अभिजातपणाचा दर्जा मिळाला असे म्हटले जाते. मराठीबाबतचा जो अहवाल तयार करण्यात आला, त्यामध्ये 'गाथासत्तसई' (गाथासप्तशती) या महाराष्ट्री भाषेतील ग्रंथाचा उल्लेख करून असा युक्तिवाद करण्यात







आला आहे की, पहिल्या शतकातील हा ग्रंथ महाराष्ट्री भाषेत असला तरी महाराष्ट्री ही मराठीचीच पूर्वावस्था होती. परंतु हे भाषावैज्ञानिकदृष्ट्या सिद्ध करणे अवघड आहे. शिवाय 'गाथासप्तशती'नंतर महानुभाव वाङ्मयापर्यंतच्या सुमारे हजार वर्षांच्या काळात अन्य काही ग्रंथ निर्माण झालेले दिसत नाहीत. ज्या ग्रंथांचा दाखला अहवालात देण्यात आलेला आहे त्या ग्रंथांत महाराष्ट्र हे प्रदेशनाम आहे, महारट्ठ लोकांचा उल्लेख आहे. परंतु ते ग्रंथ मराठी आहेत असे म्हणणे कठीण आहे. मुख्य अडचण आहे ती महाराष्ट्री आणि अपभ्रंश या भाषांमधून मराठी विकसित झाली असे आतापर्यंत सिद्ध झालेले नाही. राजवाडे प्रभृतींनी केलेला तो तर्क आहे. या संदर्भात 'ऑनलाइन बीबीसी' या आंतरजालीय वृत्तपत्रात एक लेख आलेला होता. त्या लेखाचे लेखक डॉ० चिन्मय धारूरकर हे केरळमधील कासारगोड येथे असलेल्या केरळ केंद्रीय विद्यापीठात साहाय्यक प्राध्यापक आहेत. ते म्हणतात, "आपण उत्सवप्रिय आणि उत्सववेडे झालो आहोत. मराठीसाठी अभिजात हा दर्जा मिळवून आपल्याला तो दर्जा मिळाला आहे हे साजरे करायचे आहे. यापलीकडे या मागणीबाबत लोकांना एवढा लोभ असण्याचे दुसरं तरी कोणतं कारण दिसत नाही.'' त्यांचे म्हणणे असे की, "मराठी अभिजात आहे असे सांगण्यासाठी चांगला पुरावा हवा, अस्सल प्राचीन साहित्य परंपरा हवी, शास्त्र परंपरा हवी. मराठी अभिजात नाही; कारण या परंपरा फारफार तर अकराव्या-बाराव्या शतकानंतर जोरकसपणे दिसून येतात. त्या आधीच्या प्राकृताच्या अवस्था अपभ्रंश, पैशाची, महाराष्ट्री, शौरसेनी, अर्धमागधी इ० आहेत. यापैकी कुठल्याही एकीला मराठीची आदिम अवस्था ठरवणं हे कठीण आहे. तो कालविपर्यास आणि तर्कदुष्टता आहे.'' त्यापुढे ते असे म्हणतात की, "आजघडीला परिस्थिती अशी आहे की, भाषाविज्ञानात किंवा मराठीच्या विभागांमधून प्राकृत भाषा, ऐतिहासिक भाषाविज्ञान, भाषिक पुनर्रचना या गोष्टींची नीट माहिती असलेले फार कमी लोक आहेत.''

या सगळ्यातून मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळण्याची वाट पाहात बसण्यापेक्षा आपण काही वेगळे करू शकू की नाही? उदा० महाराष्ट्री भाषांचा अभ्यास मराठी विभागांमधून करता येईल का? 'गाथासप्तशती'चे संपादन व मराठी भाषांतर सुमारे साठ वर्षांपूर्वी स०आ० जोगळेकरांनी केले. पण त्यानंतर त्या ग्रंथाचा विद्यापीठांच्या मराठी विभागांमधून अभ्यास सुरू झाला का? महाराष्ट्री प्राकृतातील इतर ग्रंथांचा मराठी वाचकाला परिचय करून देण्याचा प्रयत्न कुणी केला का? अशा ग्रंथांतील वेच्यांचे एखादे पुस्तक तयार करून ते एम०ए०च्या विद्यार्थ्यांना पाठ्यपुस्तक म्हणून नेमले गेले का?

या बाबतीत अभिजाततेचा अजिबात उच्चार न करणाऱ्या इंग्रजी भाषेकडे पाहिले तर काय दिसते? इंग्रजीची पूर्वावस्था म्हणजे अँग्लो-सॅक्सन ऊर्फ ओल्ड इंग्लिश भाषा. तिचा





अनुक्रमणिका

काळ साधारण सातवे शतक ते अकरावे शतक असा चारशे वर्षांचा होता. त्यानंतरच्या मिड्ल इंग्लिश या भाषेचा काळ अकराव्या शतकापासून पंधराव्या शतकाअखेरपर्यंत मानला जातो. आणि सोळाव्या शतकापासून इंग्रजी (आधुनिक) सुरू होते. ओल्ड इंग्लिश आणि मिड्ल इंग्लिश यांचा अभ्यास अगदी अलीकडच्या काळापर्यंत म्हणजे १९७०पर्यंत इंग्लंडमध्येच नव्हे; तर भारतातही भारतीय विद्यापीठांतील इंग्रजी विभागांमध्ये होत होता. ओल्ड इंग्लिशमध्ये 'बेउल्फ' या नावाचे महाकाव्य आहे. मिड्ल इंग्लिशमध्ये चॉसरचे 'कँटरबरी टेल्स' हे अद्यापही वाचले जाते. त्या काळातील अनेक लेखक आणि कवी यांचा अभ्यास इंग्रजी-साहित्याचे अभ्यासक करतात. तरीही इंग्रजीने कधीही आपण अभिजात आहोत असा उद्घोष केलेला नाही. ती आपल्या आधुनिकतेचाच अभिमान बाळगते!

मराठी साहित्यसंस्था आणि मराठीचे पुढारीपण करणारे बुद्धिवंत यांनी सरकारदरबारी हेलपाटे घालण्यापेक्षा मराठीचा खराखुरा इतिहास शोधून काढून त्याचा अभ्यास करण्यावर भर दिला तर मराठीला अभिजातपणाचा शिक्का घेण्यासाठी सरकारकडे अर्ज-विनंत्या करत बसण्याची वेळ येणार नाही.

■

या अंकानंतर मी 'भाषा आणि जीवन'च्या संपादनाच्या जबाबदारीतून मुक्त होत आहे. त्यामुळे हे मी लिहिलेले शेवटचे संपादकीय आहे. – प्र०ना० परांजपे.

## भाषेची कार्ये

कॉर्ल पॉपर या ब्रिटिश तत्त्वचिंतकाने माणसाच्या भाषेची चार प्रमुख कार्ये सांगितली आहेत. साद घालणे, प्रतिसाद देणे, वर्णन करणे आणि युक्तिवाद करणे. प्राण्यांच्या संवाद-पद्धती यातील पहिली दोन कार्ये पार पाडू शकतात. अगदी प्राथमिक स्वरूपात वर्णनही काही प्रमाणात केले जाऊ शकते, हे मधमाश्यांच्या उदाहरणावरून जाणवते; पण एखाद्या गोष्टीचे सांगोपांग वर्णन करणे आणि त्यापुढे जाऊन युक्तिवाद करणे हे मात्र मनुष्यनिर्मित भाषेतच शक्य असते. माणसांच्या एकंदरीत भाषा-व्यवहारात या दोन्हींचे स्थान फार महत्त्वाचे आहे. कारण, त्यांच्याखेरीज ना तत्त्वज्ञान निर्माण होत ना विज्ञान!

- दीप्ती गंगावणे (दै० सकाळ, १४ जुलै, २०१७)





अनुक्रमणिका

# इंग्रजी वळणाची बेढब वाक्यरचना

अनघा भट

इंग्रजी वळणाची बेढब वाक्यरचना ही 'भाषा आणि जीवन', दिवाळी २०१६च्या अंकातील ई-शब्दचर्चा वाचली. त्या अनुषंगाने गेल्या काही दशकांत, खासकरून वृत्तपत्रे, ई-माध्यमे आणि समाज-माध्यमे अक्षरश: बोकाळल्यानंतर, मराठीवर अशा इंग्रजाळलेल्या वाक्यरचनांचे जे अतिक्रमण सुरू झाले त्याचा हा थोडासा मागोवा.

मराठीतील वाक्यरचना व तिचे चलन याविषयी आपण इथे प्रथम चर्चा करू.

मराठीमध्ये वाक्यरचना बव्हंशी कर्तरी प्रयोग, कर्मणी प्रयोग व भावी प्रयोग या तीन प्रकारांनी सिद्ध होते. कर्तरी प्रयोगामध्ये कर्ता प्रथमा विभक्तीमध्ये असून क्रियापदाचे रूप कर्त्याच्या लिंग, वचन व पुरुष रूपांस अनुसरते. सकर्मक तसेच अकर्मक अशा दोन्ही प्रकारची क्रियापदे कर्तरी प्रयोगामध्ये वापरली जातात (उदा० तो जेवतो, तो आंबा खातो). कर्मणी प्रयोग अर्थातच सकर्मक क्रियापदांच्या बाबतीतच संभवतो. कर्मणी प्रयोगात कर्ता प्रथमान्त नसून तृतीयेत किंवा चतुर्थीत असतो. कर्म प्रथमेत असून क्रियापदाची रूपे कर्माला अनुसरतात. (त्याने आंबा खाल्ला, त्याला कादंबऱ्या आवडतात) तर तिसऱ्या पर्यायात, म्हणजे भावी प्रयोगात कर्ता व कर्म हे दोन्हीही प्रथमान्त नसतात. क्रियापद दोहोंपैकी कोणाच्याच लिंगवचनानुसार बदलत नाही, तर नेहेमीच तृतीयपुरुषी नपुंसकलिंगी एकवचनी रूपात असते (उदा० त्याने भावाला बोलावले).

आपण आपले लक्ष्य कर्मणी प्रयोगाकडे केंद्रित करू. मराठीमध्ये सर्वसाधारणपणे आढळणारा कर्मणी प्रयोग हा प्रधानकर्तृक असतो. सामान्यत: कर्मणी प्रयोगात कर्ता प्रथमान्त नसल्याने व क्रियापद कर्मानुसारी असल्याने कर्ता गौण असायला हवा. परंतु मराठीत तसे झालेले दिसत नाही. (वर उल्लेख केलेल्या ई-चर्चेमध्येसुद्धा अरुण फडके यांनी 'न्यायाधीशाने त्यांना कारावासाची शिक्षा दिली' हे कर्मणी प्रयोगाचे वाक्य कर्तरी असल्याचे सुचवले आहे.) याचे कारण मराठीमध्ये सकर्मक क्रियापदांचे भूतकाळाचे रूप होताना आख्यात बदलतो. बदललेल्या आख्याताबरोबर प्रयोगही बदलावा लागतो. जसे : तो आंबा खातो (ताख्यात), त्याने आंबा खाल्ला (लाख्यात). 'तो आंबा खाल्ला' ही वाक्यरचना प्रमाण भाषेनुसार अयोग्य मानली जाते. त्यामुळे वाक्यरचनेच्या दृष्टीने जरी क्रियापद कर्मानुसारी बनले तरीही कर्त्याच्या भूमिकेला गौणत्व येत नाही. इंग्रजीमध्ये मात्र पॅसिव्ह प्रकारच्या वाक्यरचनेत कर्त्याकडे हमखास गौणत्व येते. इतकेच नव्हे तर अनेकदा कर्त्याचा उल्लेख करणे अपरिहार्य नसते.

वरील वाक्य 'न्यायाधीशाने त्यांना कारावासाची शिक्षा दिली' इंग्रजीत ॲक्टिव्ह आणि पॅसिव्ह दोन्ही तऱ्हांनी मांडले जाऊ शकते, जसे : The judge sentenced them to imprisonment आणि They were sentenced to imprisonment by the judge. इतकेच नव्हे; तर हेच वाक्य कर्त्याचा उल्लेख वगळूनही लिहिता येते. उदा० They were sentenced to imprisonment. खास करून वृत्तपत्रांमध्ये अशा प्रकारचे वाक्य निश्चितच आढळते. मराठीमध्ये मात्र कर्मणी प्रयोगातही कर्त्याला वगळणे शक्य होत नाही. 'त्यांना कारावासाची शिक्षा दिली' हे वाक्य अपुरे वाटते. त्याकरता मराठीने 'येणे', 'जाणे', 'होणे' यांसारख्या क्रियापदाची जोड देणे बहुधा सुरू केले असावे, जसे : 'त्यांना कारावासाची शिक्षा दिली गेली.'

मोरो केशव दामल्यांनी त्यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या ग्रंथात या प्रकाराची 'नवीन कर्मणी' अशी संभावना केली आहे. दामल्यांनी नवीन कर्मणीचा उगम मराठीमध्ये संस्कृतमधून आलेल्या पुराण कर्मणीच्या 'करिजेतो, धरिजेतो, बोलिजेतो' या रूपांपासून झाला असे मानले आहे. (मोरो केशव दामले, शास्त्रीय मराठी व्याकरण, प्रस्तुत संपादित मुद्रावृत्ती, संपा० कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर, प्रथमावृत्ती, १९७०, पृ० ६२०) नवीन कर्मणीच्या उपयोगाचे क्षेत्र 'लेखी भाषा, कायदेकानू आणि सरकार दरबारचे व्यवहार' असे दामल्यांनी नमूद केले आहे. वर उल्लेख केलेल्या क्षेत्रांत नवीन कर्मणीचे उपयोजन होत असल्याबद्दलची दामल्यांची टिपणी पुढीलप्रमाणे : **'(....) ह्या प्रयोगामध्यें मुख्य धातूच्या कर्त्यास गौणत्व असून तो वाक्यात स्पष्ट सांगण्याची नेहमीं जरूर नसते किंवा कांही कारणानें तो अमुक होय असें नि:शंकपणें माहीत नसतें, किंवा माहीत असूनही तो स्पष्टपणें सांगणें राजकीयदृष्ट्या इष्ट नसतें, त्या वेळी या प्रयोगाची आवश्यकता व इष्टता भासूं लागते. इंग्रजी भाषेंत या प्रयोगाचा फार प्रचार आहे. आणि मराठीमध्यें जरी त्याचा प्रचार वाढत आहे, तरी त्याचें कार्य मराठीमध्यें दुसऱ्या अनेक प्रकारच्या रचनेनें किंवा पर्यायांनी होत असल्यामुळें इंग्रजींतल्या कर्मणि प्रयोगाइतका हा मराठींतील नवीन कर्मणि प्रयोग अगदीं नेहमींचा किंवा विशेष परिचयाचा होईल, असा रंग दिसत नाहीं.'** (मोरो केशव दामले, शास्त्रीय मराठी व्याकरण, प्रस्तुत संपादित मुद्रावृत्ती, संपा० कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर, प्रथमावृत्ती १९७०, पृ० ६२०)

मोरो केशव दामल्यांचं भाकीत खोटं पाडायचंच अशी अहमहमिका आजच्या वृत्तपत्रलेखनात आणि दूरचित्रवाणीवरील वार्तांकनात लागलेली दिसते. मुळात मराठीमधला कर्मणी प्रयोग जिथे आवश्यक तिथे कर्त्याला गौणत्व देऊ शकत नाही, ही उणीव भरून

काढण्याकरता जोड क्रियापदांसह नवीन कर्मणीची योजना करणे याला कुणाचाच आक्षेप असू नये. दर दहा कोसांवर भाषा बदलते तशीच ती दर दहा वर्षांनीसुद्धा बदलते, हेही कुणीही अमान्य करणार नाही. परंतु इंग्रजीच्या अंधानुकरणाने, वेळप्रसंगी रसभंग आणि अर्थहानी करून जर नवीन कर्मणीसदृश वाक्यरचना योजली जात असेल तर त्याची छाननी करणे योग्यच ठरते.

अगोदर उल्लेख झाल्याप्रमाणे इंग्रजीमध्ये याचा प्रचार, खास करून ललितेतर साहित्यामध्ये फार मोठ्या प्रमाणावर आहे. याचा संबंध ललितेतर साहित्य-लेखनाच्या – विशेषतः निबंध-लेखन, सामाजिक शास्त्रविषयक लेखन यांच्या शैलीशी – आहे. युरोपात प्रबोधन युग व त्यानंतर झालेल्या भौतिक शास्त्रांच्या घोडदौडीमुळे कोणतीही माहिती वस्तुनिष्ठता, व्यक्तिनिरपेक्षता यांसारख्या कसोट्यांवर जोखली जाऊ लागली. God's point of view हा वस्तुनिष्ठतेचा नवा मापदंड बनला. त्याचे प्रतिबिंब लेखनशैलीमध्ये सुद्धा पडले. कर्त्याकडे गौणत्व देऊन कृतीला ठळकपणे पुढे आणणे पॅसिव्ह प्रकारच्या वाक्यरचनांमुळे शक्य झाले.

अव्वल इंग्रजी कालखंडात, जेव्हा आधुनिक मराठी गद्याची पायभरणी झाली तेव्हा हे इंग्रजी नमुने नजरेसमोर असूनही त्यांचे इतके अंधानुकरण झाल्याचे दिसत नाही. म० फुले, लोकहितवादी, आगरकर, टिळक, चिपळूणकर यांचे किंवा त्यांच्या कोणाही समकालीनाचे लेखन ठाशीव, आशयगर्भ आणि तरीही अस्सल मराठी मुशीतले आहे. त्यानंतरच्या १८५०, १८६०च्या दशकांतील ललितेतर लेखनाने वेगळी शैली अंगीकारली असली तरीही नवीन कर्मणीचा असा सोस या लेखनानेही बाळगलेला दिसत नाही.

नवीन कर्मणीच्या अतिरेकाची सुरुवात वृत्तमाध्यमांच्या संख्येच्या प्रचंड स्फोटानंतर झाली असे दिसते. निरनिराळ्या वृत्तसमूहांच्या वृत्तपत्रांच्या गावोगावी निघणाऱ्या आवृत्त्या, त्यांच्या दैनंदिन पुरवण्या यांना मजकुराची राक्षसी भूक उत्पन्न झाली. मुळात वृत्तपत्र हे प्रबोधनाचे माध्यम न राहता जाहिरातीद्वारे उत्पन्न मिळवून देणारा एक मनोरंजन प्रकार बनला. जी गोष्ट वृत्तपत्रांची, तीच गोष्ट वृत्तवाहिन्यांची. दिवसाचे चोवीसही तास जर माहितीपर मनोरंजनाचा रतीब घालायचा असेल तर तशी तजवीज करावी लागणार, हे उघड आहे. आशयगर्भ, सकस प्रबोधन हे संख्यात्मकदृष्ट्या कमी असल्याने ही राक्षसी भूक भागावी कशी? साहजिकच त्यांचा मोहरा याच सुमाराला इंटरनेट या महामायाजालाने हातात आणून दिलेल्या माहितीच्या प्रचंड मोठ्या साठ्याकडे वळला. इंटरनेटवरचा माहितीचा धबधबा इंग्रजी भाषेतून वाहत असतो. तत्काळ पुरवठा करण्याच्या निकडीमुळे कदाचित किंवा

माध्यमांमध्ये काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या बेताच्या भाषिक कुवतीमुळे कदाचित अ-प्रमाण भाषिक प्रयोगांचे जणू पेवच फुटले. त्यात अजून नवीन कर्मणीप्रयोगात कर्त्याचा उल्लेख अपरिहार्य नसल्याने त्याला आपसूकच एक निष्पक्ष, तटस्थ विवेचनाचे वलय लाभले. लिखित व्यवहारातून औपचारिक-बोली व्यवहारातही या वाक्यरचनेने बाजी मारली. त्यामुळे चर्चासत्रातून 'असं बोललं गेलं', 'ही कविता लिहिली गेली' यांसारख्या बेंगरूळ रचना मिरवू लागल्या. कार्यक्रमांच्या सूत्रसंचालनात 'कार्यक्रमाचं उद्घाटन करण्यात आलं आहे' असं जाहीर होऊ लागलं.

आता आपण काही नवीन कर्मणी प्रयोगाच्या वाक्यरचना पाहू व तसेच त्या बेंगरूळ का वाटतात याचीसुद्धा चर्चा करू.

(१) '३,२२५ किमी लांबीच्या सीमेचा प्रश्न **चिघळला गेला.**' (कर्नल सारंग थत्ते, निवृत्त, महाराष्ट्र टाइम्स, १७ डिसें० २०१६) **चिघळणे** हे क्रियापद मुळात अकर्मक असल्याने कोणताच कर्मणी, ना नवीन ना जुना, इथे लागू होत नाही. '३,२२५ किमी लांबीच्या सीमेचा प्रश्न चिघळला' हे वाक्य व्याकरणाच्या व अर्थाच्याही दृष्टीने पूर्ण आहे.

(२) 'कारण पोलिसांना संशय आला आणि या दोघांना तिथून **हाकललं गेलं.**' (गिरीश कुबेर, अधर्मयुद्ध, राजहंस प्रकाशन) पोलीस हा या वाक्याचा कर्ता आहे. कर्त्याचा उल्लेख अगोदरच झालेला असल्याने नवीन कर्मणीचे प्रयोजन नाही. 'कारण पोलिसांना संशय आला आणि या दोघांना त्यांनी तिथून **हाकललं,**' हा पुरेसा समर्पक पर्याय आहे.

(३) 'इंग्लंडच्या गुप्तहेर यंत्रणेला या संदर्भात ठोस पुरावे सापडल्यानंतर ही सगळी माहिती अमेरिकेला **कळवली गेली.**' (गिरीश कुबेर, अधर्मयुद्ध, राजहंस प्रकाशन) इंग्लंडची गुप्तहेर यंत्रणा हा वाक्याचा कर्ता उघड असताना नवीन कर्मणी प्रयोग वापरल्याने वाक्य अकारण पसरट व विस्कळीत होत आहे. 'इंग्लंडच्या गुप्तहेर यंत्रणेला या संदर्भात ठोस पुरावे सापडल्यानंतर ही सगळी माहिती त्यांनी अमेरिकेला कळवली/ ही सगळी माहिती अमेरिकेला कळवण्यात आली' हे सुटसुटीत पर्याय आहेत.

(४) 'मग हा लेखक स्थानबद्ध **केला जातो.**' (अतुल पेठे, लोकसत्ता, रविवार १४ मे २०१७) प्रस्तुत वाक्य इंग्रजी प्रारूप समोर ठेवून 'जशास तसे' पद्धतीने भाषांतर केल्याने भलताच गोंधळ उडाला आहे. वाक्यात जर लेखक कर्ता

असेल तर 'मग हा लेखक स्थानबद्ध होतो' असे हवे. आणि जर लेखक कर्म असेल, तर तो चतुर्थ्यन्त द्वितीया विभक्तीमध्ये हवा. जसे : 'मग या लेखकाला स्थानबद्ध केले जाते.'

(५) 'अनौपचारिक शिक्षण वर्गामधून अनेक मुले महापालिकेच्या शाळेत दाखल **केली गेली**.' (महाराष्ट्र टाइम्स, १३ फेब्रु० २०१७) वरील क्र० ४मधील वाक्याप्रमाणेच इथेही मुले कर्ता की कर्म याबद्दलचा गोंधळ अनुभवास येतो. मुले कर्ता असतील तर वाक्य 'अनौपचारिक शिक्षण वर्गामधून अनेक मुले महापालिकेच्या शाळेत दाखल झाली' असे हवे. आणि जर मुले कर्म असतील तर वाक्य 'अनौपचारिक शिक्षण वर्गामधून अनेक मुलांना महापालिकेच्या शाळेत दाखल करण्यात आले/केले गेले' असे हवे.

(६) आग कशी **विझवली गेली** यावर थोडा वेळ चर्चा झाली. (सकाळ, १४ फेब्रु० २०१७) प्रस्तुत वाक्यात सान्त क्रिया दर्शवण्याकरता 'गेली' हे जोड क्रियापद वापरले असावे; परंतु व्याकरणाच्या दृष्टीने अथवा अर्थ अधोरेखित करण्याच्या दृष्टीने इथे त्याचा फारसा उपयोग झालेला दिसत नाही. 'आग कशी विझवली यावर थोडा वेळ चर्चा झाली' हे वाक्य त्यासाठी पुरेसे आहे.

मोरो केशव दामल्यांच्या उपरोक्त उद्धृतात त्यांनी नवीन कर्मणीला पर्याय म्हणून वापरण्यात येणाऱ्या रचनांचा उल्लेख केलेला आहे. त्या कोणत्या हे आपण आता पाहू.

(अ) शुद्ध सकर्मक धातूचा अकर्मकाप्रमाणे उपयोग, जसे : या जात्याने हरभरे चांगले **दळतात**. (दळले जातात.) या चाकूने खर्बुजही चांगले **कापत** नाही. (कापले जात नाही.) इ०

(आ) प्रथमाख्याती (वर्तमानकाळी) धातूचे तृतीय पुरुषी अनेकवचनी रूप योजून कर्त्याचा अध्याहार, जसे : असे **सांगतात** (सांगितले जाते किंवा सांगण्यात येते) की त्या देशात बायकांचे प्राबल्य बरेच आहे.

(इ) सकर्मक धातूच्या जवळ जाणाऱ्या अकर्मक धातूचे उपयोजन, जसे : तो तरेल (तो तारला जाईल), तो लढाईत **मेला** (मारला गेला) इ०

(ई) धातूच्या 'ला' कृदन्तापुढे वर्तमानकाळी 'आह' या सह-धातूचा उपयोग करून संयुक्त क्रियापदाची योजना, जसे : **म्हटले आहे** की (म्हटले जाते की किंवा म्हणण्यात येते की), भिक्षापति तो लक्षापति इ०





अनुक्रमणिका

(वरील सर्व उदाहरणे मोरो केशव दामले यांनी 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या ग्रंथातून (पृ० ६२१) दादोबांच्या व्याकरणातून व पूरणिकेतून घेतली आहेत) अर्थात 'नवीन कर्मणि प्रयोगाचा अर्थ प्रकट करण्याचे हे अपरपर्याय होत. हा प्रयोग इतक्या प्रकारचा आहे किंवा हे नवीन कर्मणि प्रयोगाचेच इतके निरनिराळे प्रकार होत असे मात्र समजू नये.' अशी सावधगिरीची सूचना दामल्यांनी देऊन ठेवलेली आहे. (मोरो केशव दामले, शास्त्रीय मराठी व्याकरण, प्रस्तुत संपादित मुद्रावृत्ती, संपा० कृष्ण श्रीनिवास अर्जुनवाडकर, प्रथमावृत्ती, १९७०, पृ० ६२२)

मोरो केशव दामल्यांनी सुचवलेल्या पर्यायाखेरीज कर्ता अमूक होय असे स्पष्टपणे माहीत नसेल किंवा कर्त्याचे गौणत्व बोलणाऱ्यास अपेक्षित असेल तर मराठीमध्ये 'कोण' या प्रश्नार्थक सर्वनामाचा वापर रूढ आहे. मुद्दा स्पष्ट होण्यासाठी पुढील उदाहरण पाहू:

(७) त्या वेळी आपली मागणी इतकी साधी होती; पण तीही **ऐकली गेली** नाही.' (गिरीश कुबेर, अधर्मयुद्ध, राजहंस प्रकाशन) वर उल्लेख केल्याप्रमाणे कोण या सर्वनामाचे रूप वापरून वाक्य असे दिसेल : ''त्या वेळी आपली मागणी इतकी साधी होती, पण तीही कुणी ऐकली नाही.'

मोरो केशव दामल्यांनी उल्लेख केलेल्या पर्यायांपैकी पर्याय क्रमांक २ व ४ (प्रथमाख्याती वर्तमानकाळी) धातूचे तृतीय पुरुषी अनेकवचनी रूप योजून कर्त्याचा अध्याहार व धातूच्या 'ला' कृदन्तापुढे वर्तमानकाळी 'आह' या सह धातूचा उपयोग करून संयुक्त क्रियापदाची योजना) आजही उपयुक्त वाटतात. पुढील काही उदाहरणे आपण त्यासाठी पाहू.

(८) डॉ० देवी म्हणाले, '(...) ऑस्ट्रेलियात लोकांना **मारले जात आहे**. (महाराष्ट्र टाइम्स, ३० जानेवारी २०१७) दामल्यांनी उल्लेख केलेला पर्याय वापरून हे वाक्य असे दिसेल : डॉ० देवी म्हणाले, '(...) ऑस्ट्रेलियात लोकांना **मारत आहेत**./ लोक मारले जात आहेत.

(९) 'आणि म्हणूनच रेल्वेत हिंदू धर्मीय **जाळले गेल्याच्या** घटनेनंतर गुजरातेत राज्यभर मुसलमानांना वेचून ठार **केले जाते**. (लोकसत्ता, २७ फेब्रुवारी २०१७) दामल्यांनी उल्लेख केलेला पर्याय वापरून हे वाक्य असे दिसेल : 'आणि म्हणूनच रेल्वेत हिंदू धर्मियांना जाळल्याच्या घटनेनंतर गुजरातेत राज्यभर मुसलमानांना वेचून ठार **करतात**.'





अनुक्रमणिका

वरील तीनही उदाहरणांत अनावश्यक शब्दांची भरताड नसल्याने मुद्दा थोडक्यात तरीही अधिक ठळकपणे स्पष्ट होतो. वरील तिन्ही उदाहरणे बारकाईने पाहिल्यास अजून एक गोष्ट प्रत्ययास येते. नवीन कर्मणीच्या रचनांमध्ये कर्त्याचा उल्लेख नाही तसेच त्यासाठी पर्याय म्हणून सुचवलेल्या वाक्यरचनांमध्येसुद्धा कर्त्याचा उल्लेख नाही. तरीही पर्यायी वाक्यरचना अधिक ठाम विधान करतात. कर्त्याचा उल्लेख केलेला नसला तरीही त्याच्या कर्तृत्वाविषयी संदिग्धता बाळगत नाहीत. नवीन कर्मणी प्रकारच्या वाक्यरचनांत मात्र ही संदिग्धता पुरेपूर आढळते. इतकेच नव्हे तर धातू सुचवत असलेल्या क्रियांचा कुणी कर्ता आहे अथवा नाही. की या क्रिया आपसूकच घडत आहेत अशी शंका घेण्यास वाव मिळण्यासारखी परिस्थिती निर्माण होते. भाषा आणि विचार एकमेकांशी अनोख्या प्रकारे जोडलेले असतात, असे आकलनकेंद्री भाषाविज्ञान (cognitive linguistics) सांगते. विचारांचं माध्यम भाषा असल्याने नवीन कर्मणीमध्ये प्रत्ययास येणारी संदिग्धता विचारातसुद्धा उतरते, असे मानावे का? की मुळात संदिग्धता हे ज्याचं व्यवच्छेदक लक्षण बनले आहे अशा 'आधुनिकोत्तर' जगात आपण राहत असल्याने ती संदिग्धता भाषेत प्रतिबिंबित होते असे मानावे?

■

**'मिस्टर'**

सध्याचा काळ तर असा आहे की, मराठीच अंग चोरून वावरते आहे. तेव्हा तिच्या बोलींना कितपत भाव दिला जात असेल असा प्रश्न आहे. केवळ साहित्यातील वावर वाढला म्हणून भाषेचा दर्जा सुधारेल असा आत्ताचा काळ नाही. कारण साहित्यच अडगळीत गेल्यागत वाटते आहे. गावोगावी इंग्रजीचा वापर आणि इंग्रजी माध्यमांच्या शाळांचा प्रभाव वाढतो आहे. शेतमजुराचा मुलगाही तालुक्याच्या गावी इंग्रजी माध्यमाच्या शाळांतून शिकतो आहे. बोली आपली मिरासदारी आहे असे मानणाऱ्या आणि बोलीच्या उपभोक्त्या स्त्रियाही आता इंग्रजी शब्द अहमहमिकेने वापरू लागल्या आहेत. चुकीच्या जागी वापरल्याने आणि चुकीचे शब्द वापरल्याने निरनिराळ्या गमतीजमती घडताहेत. 'मिस्टर' शब्दाने असाच धुमाकूळ घातला आहे. हिचे मिस्टर, तिचे मिस्टर म्हणता म्हणता खुद्द स्वत:च्या वडिलांना माझ्या आईचे मिस्टर म्हणण्यापर्यंत ग्रामीण स्त्रीची मजल गेली आहे. त्यातूनच सारखा कानावर आदळणारा मिनिस्टर शब्दही मधेच जोर मारतो आहे. त्यातूनच आपल्या भावाबद्दल बोलताना घाईघाईत "माझ्या भावजयीचे मिनिष्टर माझ्या घरी पावणे आले." असेही ऐकू येते आहे.

- प्रतिमा इंगोले, बोली संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणातून

# भारत आणि बहुभाषिकता

नीती बडवे

भारतीय बहुभाषिकतेचे अनेक विशेष आहेत; पण अनेक अधिकृत भाषा असलेला भारत हा काही एकमेव देश नाही. कॅनडा, स्वित्झर्लंड, बेल्जियम, लक्झम्बुर्ग असे अनेक बहुभाषिक देश आहेत. आपल्याकडे एक म्हण आहे : दर बारा कोसांवर पाणी आणि भाषा बदलतं. पाणी प्रवाही आहे आणि बहुभाषिकताही प्रवाही आणि नैसर्गिक आहे. चीनसारखा महाकाय देश एकभाषिक आहे, कारण ते एक राजकीय हेतूनं राबवलेलं धोरण आहे.

भाषास्वातंत्र्याच्या दृष्टीनं, 'भाषा-निरपेक्षते'च्या दृष्टीनं, भारताचं बहुभाषिकतेचं धोरण वाखाणण्याजोगं आहे. पण हिंदी आणि इंग्रजी ह्या संपर्क भाषांबाबत, विशेषत: इंग्रजीच्या बाबतीतली काही धोरणं खूपच आश्चर्यकारक आणि संदिग्ध आहेत.

**बहुभाषिक भारत**

भारतात बहुभाषिकता प्राचीन काळापासून, नैसर्गिकरीत्या, आपसूक विकसित झाली आहे. भारतीय सामाजिक जीवनात ही गोष्ट सर्वत्र दिसते. रोजच्या व्यवहारात खूप भारतीय लोक मातृभाषेबरोबर अन्य भाषाही बोलतात. भारतात बहुभाषिकता ही एक सातत्यानं आणि उत्स्फूर्तपणे चालणारी प्रक्रिया आहे (कृष्णा २२२).

भारतात निदान चार तथाकथित भाषा-कुलातल्या भाषा बोलल्या जातात: इंडोयुरोपीय, द्रविडी, तिबेटन-बर्मीज आणि ऑस्ट्रोआशियाई. (मल्लिकार्जुन १) त्यामुळे भारत भाषावैज्ञानिकांसाठी अगदी स्वर्ग (कत्रे ३) आहे असं मानलं जातं. पण म्हणूनच इरावती कर्वे यांनी (२१) आणि इतर अभ्यासकांनी म्हटल्याप्रमाणे (हेही लक्षात घेण्याची आवश्यकता आहे, की भाषिक राष्ट्रवाद बळावू नये याबाबत सतत जागरूक आणि सावधान राहिलं पाहिजे. भाषा आणि राष्ट्रवाद यांची सांगड घालणं हे घातक ठरू शकतं असं इतिहास सांगतो. भाषेमध्ये एकीची भावना निर्माण करण्याचं सामर्थ्य आहे; पण भाषेमुळे दुफळी निर्माण होण्याचा धोकाही संभवतो (प्रसाद ९). भाषिक विविधता समावेशक असेल तर तिथे घर्षण आणि संघर्ष कमी उद्भवतो.

भारतात बरेच वेळा दोन प्रकारचं द्विभाषिकत्व दिसतं. सर्वसाधारणपणे बहुसंख्य लोक आपला परिसर, शेजार-पाजार यामुळे दोन भाषा बोलायला लागतात. हे अनौपचारिक किंवा इन्फॉर्मल द्विभाषिकत्व. आणि दुसरा प्रकार म्हणजे उच्चभ्रू समाज मातृभाषेबरोबर इंग्रजीचा वापर करतो. हे झालं औपचारिक किंवा 'एलिट' द्विभाषिकत्व (अन्नमलाई ३६). एखादा

कोणी बोलता बोलता पटकन दुसरी भाषा बोलायला किंवा दुसऱ्या भाषेतले शब्द वापरायला लागतो. भाषेची सरमिसळ (कोड मिक्सिंग) आणि भाषापालट (कोड स्विचिंग) ह्या गोष्टी भारतात सर्रास सगळीकडे दिसतात आणि नेहमीच अनुभवाला येतात. शहरातली युवा पिढी एक वाक्य एका भाषेत सुरू करते आणि दुसऱ्या भाषेत पूर्ण करते. हे सहज आणि सर्व ठिकाणी घडत असतं. (हे योग्य की अयोग्य हा इथे चर्चेचा मुद्दा नाही.) अगदी प्रसारमाध्यमांतूनही रोज हे घडत असतं. उदाहरणार्थ, कोणतीही मुलाखत फक्त मराठी किंवा हिंदी किंवा इंग्रजीत होत नाही. किंवा जाहीर भाषणंही कित्येकदा केवळ एकाच भाषेत होत नाहीत. इतर भाषांमधले शब्द येतातच. इंग्रजी बोलताना 'that' ऐवजी कित्येकदा लोक 'की' वापरतात - म्हणजे हिंदीतला 'कि'! अलिकडची हिंदी किंवा मराठी सिनेमांची नावं किंवा गाणी ही भाषेच्या सरमिसळीची आणि भाषापालटाची उदाहरणं आहेत. अशी कितीतरी ठळक उदाहरणं आपल्या अनुभवाला येत असतात. भाषिक आणि सांस्कृतिक विविधता हे भारताचं वैशिष्ट्य आहे. ह्या विषयीची संख्याशास्त्रीय माहिती अचंबित करणारी आहे. अन्नामलाईंनी (३५) दिलेल्या आकडेवारीवरून थोडी कल्पना येईल : लोकसंख्या १०० (१२०) कोटींहून अधिक, २००हून अधिक मातृभाषा, संविधानानुसार १८ (आता २२) अधिकृत भाषा. ह्या भाषा बोलणारे ९६.३% लोक. इंग्रजी मातृभाषा असणारे ०.०२१% लोक. शैक्षणिक माध्यम म्हणून वापरात असलेल्या ४७ भाषा. वृत्तपत्रे ८७ भाषांमध्ये प्रसिद्ध होतात, तर आकाशवाणी ७१ भाषांमध्ये कार्यक्रम प्रसारित करते.

भारताचं भाषेविषयी काय धोरण आहे आणि त्यासंबंधी आपल्या घटनेमध्ये – (किंवा आजकाल मराठीत अधिकृतरीत्या वापरला जाणारा शब्द 'संविधाना'मध्ये) काय तरतुदी आहेत हेही बघू या. तसंच अन्नमलाई, मल्लिकार्जुन आणि इतर तज्ज्ञांच्या ह्या विषयीच्या मतांचीही दखल घेऊ या.

**भाषिक सेक्युलॅरिझम : भाषानिरपेक्ष समाज**

धर्मनिरपेक्षता आणि 'भाषानिरपेक्षता' हे भारतीय संविधानाचे आणि लोकशाहीचे अत्यंत महत्त्वाचे ठळक विशेष आहेत. बहुभाषिकता हे भारतीयांनी जपलेलं एक सामाईक मूल्य आहे. (अन्नमलाई : १५३) भारतीय राष्ट्रीयत्व ज्याप्रमाणे एका धर्माशी निगडित नाही, तसंच ते एका भाषेशीही निगडित नाही. (अन्नामलाई : १३१)

बहुभाषिकता हे भारताचं प्रतीक आहे. आपली भारतीय म्हणून ओळख एका भाषेशी निगडित नाही. भारत हे एक राष्ट्र बनण्यासाठी एका सामाईक भाषेची आवश्यकता आहे, असं आपली घटना मनात नाही. (अन्नामलाई : १३१) आपली घटना ही भाषिक सेक्युलॅरिझमची

बैठकच आहे. बहुभाषिकत्वाची जोपासना व्हावी म्हणून घटनेनं एका विचारप्रणालीचा पायाच घालून दिला आहे. (अन्नामलाई : १३१)

ह्या पुढची घटनेच्या भाषाविषयक धोरणामधली जाणवणारी गोष्ट म्हणजे हे धोरण लागू करायच्या प्रत्येक गटाचा उल्लेख अनेकवचनात करावा लागतो! अल्पसंख्याच्या भाषा, जमातींच्या, प्रांतांच्या, अनुसूचित जातींच्या भाषांचा, तसंच अधिकृत किंवा संपर्क भाषांचा (हिंदी आणि इंग्रजी!) घटनेमध्ये विचार केलेला आहे!! (अन्नामलाई : १३३ आणि १५३)

**भारताचं भाषाविषयक धोरण**

भारतीय संविधान किंवा राज्यघटना भारतातल्या नैसर्गिक बहुभाषिकतेला पाठिंबा देते. भारतातली संपन्न भाषिक परंपरा, विविधता आणि विकसित होणारं बहुभाषिकत्व यांच्या जोपासनेला प्राधान्य देते. ह्या दृष्टीनं घटनेमध्ये बऱ्याच तरतुदी करण्यात आल्या आहेत आणि त्यानुसार भारतीय संघराज्यानं अगदी सुरुवातीपासून दुहेरी भाषिक धोरणांनी भाषानीतीचा पाया घातला आहे : पहिलं धोरण म्हणजे अनेकविध भाषांची मौलिक परंपरा जपणं आणि दुसऱ्या बाजूनं बहुभाषिकतेला प्रोत्साहन देणं.

आदिवासींच्या भाषांचं सुद्धा संवर्धन झालं पाहिजे, ह्याची दक्षता घटनेनं घेतली आहे. अल्पसंख्य भाषासमाजांना अनेक हक्क प्रदान केले आहेत. विविध जमातींच्या आणि आदिवासींच्या भाषा जोपासण्यासाठी घटनेमध्ये विशेष नियोजन केलेलं आहे.

**कलम २९** : अल्पसंख्याक वर्गांच्या हितसंबंधांचं संरक्षण व्हावं हा ह्या कलमाचा हेतू आहे. प्रत्येकाला सांस्कृतिक आणि शैक्षणिक हक्क आहे; समाजातल्या कोणत्याही व्यक्तीला स्वत:ची भाषा, लिपी आणि संस्कृतीची जोपासना करण्याचा हक्क आहे. ह्या कलमात पुढे असंही म्हटलं आहे की राज्याच्या कोणत्याही शैक्षणिक संस्थेमध्ये कोणालाही धर्म, वंश, जात किंवा भाषेच्या कारणांनी प्रवेश नाकारता येणार नाही.

**कलम ३०** : हे कलम भाषिक अल्पसंख्याकांना आपल्या शैक्षणिक संस्था स्थापन करायचा आणि त्यांची व्यवस्था बघण्याचा हक्क देते. घटनेमधल्या तरतुदींप्रमाणे भाषांची जोपासना हा सांस्कृतिक हक्काचाच भाग आहे.

**कलम ३५(अ)** : ह्या कलमात घटनेनं विशेष निर्देश दिले आहेत. त्यानुसार प्रत्येकाला प्राथमिक शिक्षण मातृभाषेत घेता येईल, यासाठी पुरेशा सोयी उपलब्ध करून दिल्या जाव्यात. ह्याची अंमलबजावणी व्हावी ह्यासाठी राष्ट्रपती अध्यादेश काढू शकतील.



अनुक्रमणिका

**कलम ३५०(ख)** : अनुसार अल्पसंख्याक भाषासमाजाचे हितसंबंध जपले जावेत म्हणून राष्ट्रपती एक विशेष अधिकारी नेमतील.

मातृभाषेच्या सर्वेक्षणातून आपल्याला वाटतं त्याहून वेगळी माहिती पुढे येते. कारण जनगणना होते, तेव्हा बरेचदा मातृभाषा म्हणून बोलींचा उल्लेख न करता राज्याची भाषाच मातृभाषा म्हणून देण्याकडे कल असतो, सुशिक्षित समाजाची भाषा म्हणून तिच्याकडे बघितलं जातं. ही एकप्रकारे राजकीय गरज असते आणि तडजोडही असते. भाषेचा प्रत्यक्ष वापर तिथे अभिप्रेत नसतो. (अन्नमलाई : १६) त्या भाषासमाजाचा घटक म्हणून ओळख निर्माण करण्याचा, ऐक्याच्या भावनेचा, भाषेच्या राजकीय प्रभावाचा भाग त्यामध्ये असतो.

सामाजिक द्वि किंवा बहुभाषिकता आणि भाषापालट (कोड स्विचिंग) ह्यामुळे भाषा बदलत राहतात. अन्नमलाई म्हणतात (२०८-२१३) त्याप्रमाणे हा बदल बरेचदा एका दिशेनं होणारा आणि केंद्राभिमुख असतो. म्हणजे आदिवासी भाषा प्रमाण-भाषेच्या दिशेनं बदलतात. पण मराठी आणि कानडीसारख्या भाषांचा एकमेकींवर परिणाम होत असतो. तेव्हा हे अभिसरण दोन्ही दिशांनी होतं. तसंच कितीतरी भारतीय भाषांचा भारतीय इंग्रजीवर प्रभाव पडलेला आपल्याला दिसतो.

**आणखी एक महत्त्वाचा मुद्दा** : भारतात आपल्याला असं दिसतं की, व्यवहारातल्या निरनिराळ्या भाषांच्या वापरामुळे कोणत्याही प्रकारे संघर्ष निर्माण न होता व्यक्तित्वाच्या वेगळ्या बाजू विकास पावत असतात. कारण भारतामध्ये वांशिक, व्यावसायिक, धार्मिक किंवा मनोरंजनासाठी वापरल्या जाणाऱ्या भाषा बरेचदा वेगवेगळ्या असतात. उदाहरणार्थ, दिल्लीत राहणारा तमीळ माणूस घरात तमीळ बोलतो; कामाच्या ठिकाणी इंग्रजी बोलतो; टॅक्सीवाल्याशी, भाजीवाल्याशी हिंदी बोलतो आणि देवळात प्रार्थना संस्कृतमध्ये करतो. एका दिवसात प्रसंगानुरूप तीन किंवा चार भाषा बोलणारे बरेच लोक असतात. (प्रसाद २८)

**भाषावार प्रांतरचना**

१९५६च्या कायद्यानुसार प्रत्येक भाषेसाठी एक स्वतंत्र प्रांत निर्माण करण्याचा संकल्प किंवा प्रयत्न नव्हता. प्रत्येक प्रांताला एक भाषा असेल हे भाषावार प्रांतरचनेचं पायाभूत तत्त्व होतं ही सर्वसाधारणपणे बहुसंख्य लोक बोलतात ती भाषा असेल. त्या भाषेत किंवा भाषांमध्ये त्या राज्याचा व्यवहार चालेल. (अन्नमलाई : १५३). राजकीय व्यवहारासाठी भाषानिवडीचा राज्यांना अधिकार आहे. त्यांच्या सूचनेप्रमाणे राष्ट्रपती अध्यादेश काढतात. पण भारतातल्या प्रत्येक प्रांतात इतर भाषाही बोलल्या जातात.





अनुक्रमणिका

भारतातला एकही प्रांत केवळ एक-भाषिक नाही. भारतामध्ये भाषिक सीमा काही फार कडक नाहीत. त्या सहजपणे ओलांडल्या जात असतात.

अखिल भारतीय शैक्षणिक मंडळानं १९५६मध्ये त्रिभाषा-सूत्रीची शिफारस केली. १९६८ साली त्याचं स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे देण्यात आलं : एक म्हणजे कुटुंबाची किंवा राज्याची भाषा, दुसरी भाषा इंग्रजी; आणि ज्या राज्यांची भाषा हिंदी नाही तिथे हिंदी ही तिसरी भाषा म्हणून शिकवावी; तसंच हिंदी राज्यभाषा असलेल्या ठिकाणी इतर कोणतीही एक आधुनिक भारतीय भाषा शिकवावी. (मल्लिकार्जुन १४, १५).

शाळांमध्ये सर्वसाधारणपणे जरी तीन भाषा शिकवल्या जात असल्या, तरी पुष्कळ भारतीय राज्यांत ह्या शिफारशी फार कडकपणे अमलात आणल्या जात नाहीत. १९६८चं राष्ट्रीय शैक्षणिक धोरण म्हणजे प्रांतीय भाषा समाविष्ट असलेली त्रिभाषा-सूत्री आहे. (मल्लिकार्जुन १४, १५)

भारतीय घटनेनं जाणीवपूर्वक बहुभाषिकतेची हमी दिली आहे. तसंच घटनेमधून आणि शैक्षणिक धोरणातून बहुभाषिकत्वाला प्रोत्साहन दिलं आहे. शालेय शिक्षणाच्या वाटचालीत प्रत्येक जण प्रांतीय भाषा किंवा मातृभाषा ह्याखेरीज कमीतकमी आणखी दोन भाषा शिकत असतो. पण अन्नमलाईंच्या (३६) म्हणण्याप्रमाणे शालेय शिक्षणातून फक्त २५% बहुभाषिकता येते. भारतात रोजच्या व्यवहारातून आणि परिसरात बोलल्या जाणाऱ्या भाषांमुळे बहुभाषिकता सातत्यानं विकसित होते.

**भारतीय बहुभाषिकतेचे विशेष**

भारतामधल्या बहुभाषिकतेची आणि भारतीय भाषानीतीची अनेक वैशिष्ट्यं आहेत. भारतीय संघराज्याच्या संविधानात भाग १७ कलम ३४३मध्ये राजभाषेविषयी विवरण आहे. त्यात खाली थोडक्यात दिल्याप्रमाणे हिंदी आणि इंग्रजीच्या वापराबद्दल आश्चर्य वाटण्यासारखी काही कलमे आहेत. उदाहरणार्थ : कलम ३४३(२) किंवा ३४८.

- मुख्य गोष्ट म्हणजे कोणतीही भाषा भारताची राष्ट्रभाषा नाही.
- भारतीय राष्ट्रीयत्व जसं एका धर्माशी निगडित नाही, तसंच एका भाषेशीही निगडित नाही.
- **कलम ३४३** : देवनागरी लिपीतली हिंदी ही राजभाषा आहे.
- **कलम ३४४** : हिंदी ह्या राजभाषेसाठी आयोग व संसदीय समितीची स्थापना केलेली आहे. ही समिती दर पाच वर्षांनी भाषेशी निगडित प्रश्नांचा आढावा घेईल आणि जरूर ते बदल सुचवेल. त्याचबरोबर पहिल्या पाच ते दहा वर्षांत शासकीय प्रयोजनांसाठी अधिकाधिक प्रमाणात हिंदी वापरली जाईल आणि इंग्रजीच्या वापरावर निर्बंध घातले जातील.





अनुक्रमणिका

- प्रशासकीय कारणासाठी वापरायच्या अंकांचं रूप हे भारतीय अंकांचं आंतरराष्ट्रीय रूप असेल.
- **कलम ३५१** : ह्या कलमात हिंदी भाषेच्या विकासासाठी निर्देश देण्यात आले आहेत. बहुसंस्कृती असलेल्या देशात अभिव्यक्तीचं मध्यम म्हणून सर्वांना समजेल अशा रीतीनं हिंदीचा विकास करणं हे संघराज्याचं कर्तव्य आहे.
- भारतात खूपदा हेतुनुसार आणि बोलण्याच्या संदर्भाप्रमाणे भाषा निवडली जाते. विशेषत: शहरांमध्ये. जात, धर्म, कुल, वंश ह्यापेक्षा हेतू काय आहे, कोणत्या क्षेत्रात भाषा वापरायची आहे, यावर भाषेची निवड अवलंबून राहते.
- **कलम ३४५, ३४६, ३४७** : ही कलमं राज्यांच्या अधिकृत भाषा ठरवण्याबाबत आहेत. त्यात एक किंवा जास्त भाषा निवडीचं स्वातंत्र्य दिलेलं आहे.
- संविधानाच्या आठव्या अनुसूचीत १९५०मध्ये १४ भाषांची अधिकृत यादी जाहीर केली होती. (आसमिया, उड़िया, उर्दू, कन्नड, कश्मीरी, हिंदी, गुजराती, तमिळ, तेलुगू, पंजाबी, बांग्ला, मराठी, मलयालम, संस्कृत). त्यात २००४पर्यंत आणखी आठ भाषांचा समावेश केला गेला. (मल्लिकार्जुन १०, ११) त्यामुळे आता एकूण २२ भारतीय भाषा अनुसूचीत आहेत. (सिंधीचा १९६७मध्ये, कोंकणी, नेपाळी, मणिपुरी १९९२मध्ये; मैथिली, संथाली, डोगरी, बोड़ो ह्या चार भाषांचा २००४मध्ये समावेश करण्यात आला.) (अन्नामलाई १३४)
- घटनेच्या अनुसूची ८मध्ये म्हटल्याप्रमाणे अजून ३८ भाषा सूचित समाविष्ट होण्यासाठी उत्सुक आहेत.

  **उदाहरणार्थ** : मिझो, इंग्रजी, भोजपुरी, पहाडी, शौरसेनी, खासी, तुळू इत्यादी.
- भारतात भाषा आणि प्रांत यांचं प्रमाण अर्थातच १:१ असं नाही.
- हिंदी आणि इंग्रजी ह्या एकाहून अधिक प्रांतांच्या भाषा आहेत. नेपाळी, सिंधी आणि संस्कृत ह्या कोणत्याही प्रांताच्या भाषा नाहीत.
- अल्पसंख्याक भाषासमाजाच्या केंद्रीय आयुक्तांच्या जून २०१३च्या अहवालाप्रमाणे उर्दू ही उत्तर प्रदेशमध्ये आणि तेलंगणामध्ये अल्पसंख्याकांची भाषा आणि दुसरी अधिकृत भाषा आहे, तर उर्दू ही जम्मू-काश्मीरची पहिली अधिकृत भाषा आहे.
- इंग्रजी अरुणाचल प्रदेश, सिक्कीम, नागालँड ह्या राज्यांची आणि चंडीगड, लक्षद्वीप ह्या केंद्रशासित प्रदेशांची राज्यभाषा आहे!





अनुक्रमणिका

- पुदुच्चेरी, मिझोरम, त्रिपुरा तसंच अंदमान-निकोबार ह्या ठिकाणी सह-राज्यभाषा इंग्रजी आहे.
- इंग्रजी ही हिमाचल प्रदेश, मणिपूर, राजस्थान, तामिळनाडूमध्ये अतिरिक्त राज्यभाषा आहे. (मॅप्स ऑफ इंडिया)
- मिझो, खासी, इंग्रजी ह्या काही राज्यांच्या अधिकृत भाषा असूनही त्यांचा अनुसूचित भाषांमध्ये समावेश करण्यात आलेला नाही.

भारतीय बहुभाषिकतेच्या अजून काही मजेदार बाजू आहेत -

- हिंदी ही राजकारणाची भाषा आहे, पण हिंदी भाषिक राज्यं आर्थिकदृष्ट्या फारशी विकसित नाहीत. भाषिक वर्चस्व हे आर्थिक प्राबल्याशी बांधलेलं नाही. (शान्था रामकृष्ण १९.)
- मराठी आणि गुजराती भाषा ह्या आर्थिक दृष्ट्या विकसित राज्यांच्या भाषा आहेत, पण त्या भाषिक वर्चस्व सांगत नाहीत. (शान्था रामकृष्ण १९)
- इंग्रजी ही काही राजकारणाची भाषा नाही. राजकीय दृष्ट्या प्रभावी नाही. इंग्रजी काही निवडणूक प्रचाराची किंवा कार्यक्रमाची भाषा नाही (अजून तरी नाही!). पण ती एक अधिकृत भाषा आहे आणि सामाजिक प्रतिष्ठेशी ती निगडित आहे.
- हिंदी आणि इंग्रजीच्या वापरात व्यावहारिक फरक आहे. पण आपण भारताचा इतिहास बघितला, तर असं लक्षात येतं, की आपल्या सामाजिक-राजकीय परिस्थितीमध्ये आणि द्विभाषिक समाजरचनेमध्ये दोन्ही भाषांना आपापली जागा आहे. दोन्ही भाषा अधिकृत आणि संपर्क भाषा म्हणून सहज सामावल्या आहेत! (मल्लिकार्जुन ८)
- भारतीय भाषांसाठी वापरल्या जाणाऱ्या लिप्यांना भाषांसारख्या सीमा नाहीत. भारतीय भाषा १४हून जास्त लिप्यांमध्ये लिहिल्या जातात. भारतात लिप्यांमध्ये पारंपरिक बहुविधता आहे. इथे एक भाषा अनेक लिप्यांमध्ये लिहिली जाते किंवा एकच लिपी अनेक भाषांसाठी वापरली जाते. (मल्लिकार्जुन ४, ५).

**हिंदी आणि इंग्रजीचं स्थान**

- हिंदी अधिकृत आणि अनुसूचीत मान्यता असलेली राजभाषा आहे.
- कलम ३४३(१)प्रमाणे हिंदी ही भारतीय संघराज्याची राजभाषा आहे.
- भारतीय संघराज्याची अधिकृत भाषा देवनागरीत लिहिली जाणारी हिंदी आहे. अंक आंतरराष्ट्रीय पद्धतीचे भारतीय अंक असतील.



अनुक्रमणिका

- हिंदी हा एक ४५ मातृभाषांचा समूह आहे. त्यात भोजपुरी, मागधी, मारवाडी, मैथिली, राजस्थानी, इत्यादी भाषा मोडतात. (मल्लिकार्जुन ११)
- इंग्रजी अनेक प्रांतांमध्ये आणि केंद्रशासित प्रदेशांत राज्यभाषा किंवा सह-राज्यभाषा आहे.
- तरीही इंग्रजी ही घटनेतल्या अनुसूचीत २२ भाषांमध्ये समाविष्ट केलेली नाही.
- इंग्रजी ही एक भारतीय आणि सरकारी पातळीवर अधिकृत संपर्क भाषा आहे.
- **कलम ३४३(२)** : घटना लागू होण्यापूर्वीपासून घटना लागू होईपर्यंत इंग्रजी ज्या शासकीय प्रयोजनासाठी वापरली जात होती त्या, तशीच ती भारतीय संघराज्यात सर्व अधिकृत कारणांसाठी पुढची १५ वर्षं अधिकृत भाषा म्हणून वापरली जाईल.
- **कलम ३४३(२)** : प्रशासकीय कोणत्याही प्रयोजनासाठी इंग्रजीच्या जोडीस हिंदीचा (!) वापर करायचा असेल, तर तसा तो राष्ट्रपतींच्या आदेशाद्वारा करता येईल.
- **कलम ३४३(३, ४)** : घटना लागू झाल्यापासून १५ वर्षांनंतर ठरावीक क्षेत्रात इंग्रजीच्या किंवा देवनागरी अंकांच्या वापरासाठी संसद कायदा करू शकते.
- **कलम ३४४** : प्रथम ५ वर्षांनी आणि मग १० वर्षांनी भाषाविषयक प्रश्नांचा आढावा घेण्यासाठी एका आयोगाची स्थापना करण्यात येईल. तीस जणांची समिती अहवाल तयार करून आयोगाकडे पाठवेल. आयोगाच्या शिफारशीनुसार राष्ट्रपती योग्य वाटेल तिथे बदल करण्याचे अध्यादेश काढतील.
- **कलम ३४८** : सर्वोच्च आणि सर्व उच्च न्यायालयांमधील सर्व कारवाई संसदेच्या पुढील आदेशापर्यंत इंग्रजीत होईल. संसदेत मांडायची विधेयके, पारित केलेले नियम, अधिनियम, विधेयके इंग्रजीत प्रसिद्ध होतील.
- उच्च न्यायालय ज्या राज्यात असेल, त्या राज्याच्या भाषेचा किंवा हिंदी भाषेचा वापर राष्ट्रपतींच्या पूर्व परवानगीने राज्यपालांच्या अध्यादेशानुसार करता येईल.
- अशा वेळी राज्यांमधले कोणतेही नियम, आदेश, उपविधी यांचे राज्यपालांच्या संमतीने शासकीय राजपत्रात प्रसिद्ध केलेले **इंग्रजीतले अनुवाद हे 'प्राधिकृत पाठ' असतील!**
- **कलम ३४९** : संसदेमध्ये कोणालाही भाषेसंबंधी काही बदल सुचवायचे असतील तर ते आयोगाच्या शिफारशीनुसार राष्ट्रपतींच्या पूर्वसंमतीनेच सुचवता येतील.

आपण सर्वसाधारणपणे असं म्हणू शकतो :

- इंग्रजी ही शिक्षणाची एक माध्यम भाषा आहे.





अनुक्रमणिका

- इंग्रजीचा शिक्षणासाठी, विशेषत: उच्च शिक्षणासाठी वापर होतो.
- इंग्रजी हा शालेय पाठ्यक्रमात एक विषय आहे.
- द्विभाषिकत्वामध्ये इंग्रजीचं एक वेगळंच स्थान आहे.
- इंग्रजी ही व्यावहारिक गरज आहे आणि कोणत्याही व्यावसायिक क्षेत्रात प्रगतीसाठी सर्वसाधारणपणे महत्त्वाची मानली जाते.
- साधारणपणे इंग्रजी शिकण्याची सुरुवात उशिरा, म्हणजे शालेय वयात होते.
- भारतीयांचा इंग्रजीकडे बघण्याचा दृष्टिकोण अनिश्चित, अस्पष्ट, संदिग्ध, अनेकविध असतो.
- इंग्रजी ही परकीय भाषा आहे, पण अनेक पालकांची अशी इच्छा असते, की मुलांनी पहिली भाषा म्हणून इंग्रजी शिकावी. (मल्लिकार्जुन ८)
- भारतीय वित्त, उद्योग, व्यवसाय, राजकारण, करमणूक तसंच सामाजिक क्षेत्रात इंग्रजी बोलणारे जरी थोडे लोक असले, तरी त्यांचा प्रभाव दिसतो. त्यामुळे इंग्रजीशी सामाजिक प्रतिष्ठा जोडली गेली आहे.
- हे एक विचित्र द्विभाषिकत्व आहे. इथे वांशिक किंवा धार्मिक गोष्टींशी फारसा संबंध येत नाही. (मल्लिकार्जुन ८)

कृष्णा (२१९) म्हणतात त्याप्रमाणे – विविधता जोपासणं आणि त्याच वेळी ऐक्याला प्रोत्साहन देणं – ह्या संघर्षात सुवर्णमध्य गाठणं हे भारतापुढचं खरं आव्हान आहे. प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ पट्टनायक यांचं मत कृष्णांनी उद्धृत केलं आहे (२२५). पट्टनायक म्हणतात, 'समाजातल्या विविधतेला मान्यता दिल्यामुळे विघटनाची चळवळ निर्माण होत नाही, तर दडपशाहीमुळे विघटनाला चालना मिळते.'

भारतीय घटनेनुसार बहुभाषिकतेविषयी काय तरतुदी आहेत आणि भारतात प्रत्यक्ष व्यवहारात बहुभाषिकता कशी रुजलेली आहे; हे या आढाव्यावरून स्पष्ट होईल.

संदर्भ :

1. Annamalai, E. 2001 : Managing Multilingualism in India, Political and Linguistic Manifestations, Language and Devolopment Vol. 8, Sage Publications India Pvt. Ltd., New Delhi.
2. Kalelkar N.G. & Khubchandani L.M. (ed) : Linguistics and Language Planning in India, Deccan College, Pune, 1969.

3. Karve Iravati "Language as a social factor", in Kalelkar/ Khubchndani, P. 20-26.
4. Katre S.M. Inaugural talk on "Linguistics and Language Planning in India", in Kalelkar/Khubchndani, P. 1-4.
5. Krishna, Sumi 1991 : India's living languages. The critical issues, Allied Publishers Ltd., Bombay. In that : "The critical issues : Options and Priorities", P. 219-238.
6. Mallikarjun, B. 2004 : Indian Multilingualism, Language Policy and the Digital Divide http://www.elda.org/en/proj/scalla/SCALLA2004/mallikarjunv3.pdf
7. Prasad N.K. 1979 : The Language Issue in India, Leeladevi Publications, Delhi 110 035.
8. Ramakrushna Shantha (ed.) 1997 : Translation and Multi-lingualism, Post-colonial context. Pencraft International, New Delhi 110 052.
9. https://www.mpscmaterial.com/wp-content/uploads/2018/02/ Constitution Of IndiaMarathi.pdf
10. http://www.languageinindia.com/
11. An online journal with references from Indian constitution.
12. http://www.sudharsansn.com/data/Multilingualism-Sudharsan.pdf
13. http://www.mapsofindia.com/culture/indian-languages.html Statewise language %. Mapsofindia site.
14. http://www.mapsofindia.com/culture/indian-languages.html
15. http://mha.gov.in/sites/default/files/EighthSchedule_19052017.pdf
16. http://nclm.nic.in/shared/linkimages/NCLM50thReport.pdf
17. http://censusindia.gov.in/2011Census/Language_MTs.html

■



## भारतवाणी

प्र०ना० परांजपे

'भारतवाणी' ही सर्व म्हणजे १२० भारतीय भाषांना आपल्या कवेत सामावून घेणारी एक महत्त्वाकांक्षी व दीर्घ काळ चालणारी योजना आहे. दृक्श्राव्य, पाठ्य, मुद्रण, छाया अशा बहुविध माध्यमांद्वारा भारतीय भाषांबद्दल आणि भाषांमधून ज्ञान उपलब्ध करणे, त्याचा प्रसार करणे हे या योजनेचे उद्दिष्ट आहे. त्यासाठी संवादात्मक, गतिशील आणि सर्वसमावेशक असे आंतरजालीय संकेतस्थळ निर्माण करून भारतीय समाजाला 'मुक्तज्ञान समाज' बनवणे हा या योजनेचा हेतू आहे. सर्व सामाजिक, आर्थिक व शैक्षणिक स्तरांतील कोणत्याही वयाच्या व्यक्तींना भारतवाणीचा उपयोग व्हावा असा या योजनेच्या आयोजकांचा प्रयत्न आहे. म्हैसूरच्या 'भारतीय भाषा संस्थाना'ची ही योजना आहे. योजनेसाठी सामग्री गोळा करताना सरकारी व बिनसरकारी संस्था, विद्यापीठे, अन्य शिक्षणसंस्था, प्रकाशनगृहे, ग्रंथवितरण केंद्रे इत्यादींना भारतीय भाषा संस्थान सामील करून घेत आहे. त्याचप्रमाणे भाषांसाठी उपलब्ध असलेले सर्व तंत्रज्ञान, उदा० मुद्राक्षरे, टंकलेखन साधने, भ्रमणध्वनीवरील ॲप्स, भाषांतर साधने, संहितेचे भाषणात रूपांतर आणि भाषणाचे संहितेत रूपांतर करण्याची साधने सर्व भाषकांना उपलब्ध करून देणे हेही या योजनेचे एक उद्दिष्ट आहे. ही योजना शेती, व्यवसाय, व्यापार, शिक्षण, सेवा अशा सर्व घटकांशी संबंध ठेवून एकाच संकेतस्थळावर सर्व भारतीय भाषांचे आंतरजालावर अस्तित्व निर्माण करील आणि त्याद्वारा नष्टप्राय होत असलेल्या अल्पसंख्याक आदिवासी, भटक्या समाजांच्या निजभाषांना आंतरजालावर स्थान मिळवून देईल. परिणामत: भाषांच्या द्वारा भारतातील सर्व समाजघटकांशी ही योजना जोडली जाईल. त्यासाठी या योजनेने पुढील कार्ये आपल्यासाठी ठरवून घेतली आहेत.

(१) भाषा आणि साहित्य यांचे अंकीय (डिजिटल) व विद्युत परमाण्वीय (इलेक्ट्रॉनिक) स्वरूपात दस्तावेजीकरण करणे.

(२) लिपी व मुद्राक्षरे यांची संकेतचिन्हे तयार करणे.

(३) शब्दकोश व शब्दार्थकोश निर्माण करणे.

(४) लिखित आणि मौखिक साहित्याचे व ज्ञानसंहितांचे आधुनिक आणि अभिजात भाषांत भाषांतर करणे.








(५) भाषांचे अध्ययन आणि अध्यापन करणे. भाषाशिक्षकांचे प्रशिक्षण करून त्यांना प्रमाणपत्र देणे. आणि ऑनलाईन अभ्यासक्रमांचे परीक्षण व मूल्यमापन करणे.

भारतवाणी योजनेतील सामग्री स्वामित्वहक्कमुक्त असेल. आणि त्यामुळे कुणालाही ती मुक्तपणे वापरता येईल. भारतवाणीचे व्यवस्थापन भारतीय भाषा संस्थान करते. मान्यताप्राप्त भाषावैज्ञानिक आणि तज्ज्ञ यांची राष्ट्रीय सल्लागार समिती आणि तंत्रज्ञान सल्लागार समिती यांच्याद्वारे आणि प्रत्येक भाषेसाठी नेमण्यात आलेल्या तज्ज्ञ मंडळाकडून भारतवाणी योजना राबवली जात आहे.

या योजनेत समाविष्ट करण्यात आलेल्या १२१ भारतीय भाषांची यादी येथे दिली आहे. (यांतल्या काही भाषांची नावेसुद्धा आपल्याला अपरिचित आहेत. ती आपल्याला माहीत व्हावीत असा उद्देश ही यादी देण्यामागे आहे.)

'भारतवाणी'ला ज्या भाषांमध्ये आणि ज्या भाषांसाठी मुक्तस्रोत ज्ञानसामग्री निर्माण करायची आहे त्या भाषा पुढीलप्रमाणे :

| | | | |
|---|---|---|---|
| १ आदी | १८ देउरी | ३५ कबुइ | ५२ कोन्याक |
| २ अनाल | १९ डिमासा | ३६ कन्नड | ५३ कोरकु |
| ३ अङगामी | २० डोगरी | ३७ कार्बी | ५४ कोरवा |
| ४ आओ | २१ गदबा | ३८ कश्मीरी | ५५ कोया |
| ५ असमिया | २२ गाङटे | ३९ खानदेशी | ५६ कुइ |
| ६ बैगा | २३ गारो | ४० खरिया | ५७ कुरुख |
| ७ बाल्टी | २४ गोंडी | ४१ खासी | ५८ लद्दाखी |
| ८ बंजारा | २५ गुजराती | ४२ खेझा | ५९ लहांदा |
| ९ बांगला | २६ गुरूङ | ४३ खियेमनुङन | ६० लाहुली |
| १० भीली | २७ हलाम | ४४ कोंध | ६१ मारा |
| ११ भूमिज | २८ हल्बी | ४५ किन्नौरी | ६२ तिवा |
| १२ भुटिया | २९ हिंदी | ४६ कोच | ६३ लेपचा |
| १३ विष्णुप्रिया | ३० मार | ४७ कोडा/कोरा | ६४ लियाङमइ |
| १४ बोडो | ३१ हो | ४८ कोलामी | ६५ लिम्बू |
| १५ चोकरी | ३२ इरुळा | ४९ कोम | ६६ लोथा |
| १६ चाङ | ३३ जातपु | ५० कोंडा | ६७ मिजो |
| १७ कोडवा | ३४ जुआंग | ५१ कोंकणी | ६८ महाल |





अनुक्रमणिका

६९ मैथिली
७० मलयालम
७१ माल्टो
७२ मणिपुरी
७३ माओ
७४ मराम
७५ मराठी
७६ मारिङ
७७ मिसिङ
७८ मिशमी
७९ मोग
८० मोनपा
८१ मुंडा
८२ मुंडारी
८३ नहाली
८४ नेपाली
८५ निकोबारी
८६ निशी
८७ नोकते
८८ ओडिआ
८९ पाइते
९० पारजी
९१ पावी
९२ फोम
९३ पोचुरी
९४ पंजाबी
९५ राभा
९६ राइ
९७ रेङमा
९८ साङतम
९९ संस्कृत
१०० संताली
१०१ सवरा
१०२ सेमा
१०३ शेरपा
१०४ शिना
१०५ सिमते
१०६ सिंधी
१०७ तमाङ
१०८ तमिल
१०९ ताङखुल
११० ताङसा
१११ तेलुगु
११२ थाडो
११३ तिब्बती
११४ कॉकबरक
११५ तुळु
११६ उर्दू
११७ वाइफेइ
११८ वांचो
११९ यिमचुङरे
१२० जेमे
१२१ जउ

■

**मराठीचे आद्यरूप**

कोणत्याही बोलीला मराठीचे आद्यरूप, लिखित स्वरूप प्राप्त झाले की, भाषा स्थिरावते. तिला बोलीपेक्षा उन्नत स्वरूप प्राप्त होते. यादृष्टीने प्राकृत ग्रंथ ''गाथासप्तसई'' म्हणजे ''गाथासप्तशती'' वऱ्हाडातील वाशीमला लिहिला गेला किंवा संपादित केला गेला आणि प्राकृत बोलीला प्राकृत भाषेचा दर्जा प्राप्त झाला. अर्थातच तेव्हा महाराष्ट्राची प्रमाण भाषा वऱ्हाडाची, त्यातही वाशीमची प्राकृत होती. वऱ्हाडच्या भाषेने महाराष्ट्रावर प्रमाणभाषा म्हणून तेव्हापासून जे राज्य केले ते ज्ञानेश्वरीपर्यंत! कारण त्यानंतरही 'विवेकसिंधू' व 'लीळाचरित्र' ग्रंथ होतेच. अकराव्या शतकात 'विवेकसिंधू' आणि बाराव्या शतकातील 'लीळाचरित्र' वऱ्हाडीपूर्व बोलीतून लिहिले गेले. तेव्हा महाराष्ट्राची प्रमाणभाषा वऱ्हाडीपूर्व भाषा होती. तिलाच महाराष्ट्री अथवा देशी म्हणत होते. तीच मराठीचे आद्यरूप होती.

- प्रतिमा इंगोले, बोली संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणातून

# हम आदमी नहीं आँकडे हैं

सदाशिव देव

भाषा आणि जीवन (वर्ष ३२, अंक ४. दिवाळी २०१४, पृष्ठ १०) या अंकात कविमित्र श्री कुँवर नारायण यांची 'आँकडो की बिमारी' या नावाची अर्थपूर्ण, मनोहारी कविता प्रसिद्ध झाली आहे. आधुनिक काळात अगदी सामान्य जीवन जगणाऱ्या माणसाला अनेक प्रकारच्या अंकांना सामोरे जावे लागते. हे अंकबाण माणसाला घायाळ करतात, एवढेच नव्हे, तर माणसाचे जीवन संकटांनी असह्य करून सोडतात. शरीरात एखादा विषाणू शिरला तर माणसाची रुग्ण अवस्था होते, त्याला दवाखान्यात दाखल करावे लागते, व अनेक उपचारानंतर अखेर त्याची या दाहातून सुटका होते हा या कवितेचा भावार्थ. अगदी यथार्थ शब्दयोजना करून कुँवर नारायण यांनी या अर्थ-अंक संकटाची जाणीव करून दिली. त्याबद्दल कवीचे कौतुक करावे तेवढे थोडेच! कुँवरजी, तुम्हांला भोगावी लागलेली व्यथा, ही खरेतर अनेकांची आहे, माझीही आहे! त्यामुळे तुम्हांला भोगाव्या लागलेल्या व्यथेत माझीही सहवेदना व्यक्त करतो.

ही 'आँकडों की बिमारी' तुमच्या लक्षात आल्यावर तुम्ही दवाखान्यात दाखल झालात हे मात्र खूपच गरजेचे होते. येथे 'खूप' हा शब्द मी टाळला असता तर बरे झाले असते. कारण हा शब्द अंकग्रस्त आहे. डॉक्टरांनी तुमची नाडी लगेच तपासली असेलच; कारण त्यांना तुमच्या हृदयाचे ठोके मोजायला हवे होते. थर्मामीटर लावून त्यांनी शरीरातील तापही मोजला असेल. अशा प्रसंगी डॉक्टर रक्तदाब पाहणारच. 'खून चढाया' जाण्याच्या वेळी रक्त किती द्यायचे, कोणत्या घनतेचे द्यायचे, किती वेळात द्यायचे असे सगळे सोपस्कार डॉक्टर करणारच. ते करण्यासाठी त्यांनी किती अंकांचा आधार घेतला, असेल ते त्यांचे त्यांनाच माहीत! तुमच्या अंगाला 'अंक' विषाणूची बाधा झाली असल्याने डॉक्टरांनी अनेक अंकांच्या हिशोबाच्या साहाय्याने तुमच्यावरील उपचारपद्धती ठरवली. 'काट्याने काटा काढावा,' हा मंत्र तुमच्यावरील निदानात त्यांना उपयोगी ठरला व तुम्ही या जीवघेण्या दुखण्यातून सावरला ही समाधानाची गोष्ट!

तुमची ही कविता मी एकदा नव्हे; तर तीनचार वेळा वाचली. त्यातला काव्यांश अनुभवावा हा हेतू! पण या पंक्ती वाचताना तुम्ही योजलेले शब्दही मी गोळा करत गेलो. त्यातील काही एकाक्षरी तर काही दोन-तीन-चार अक्षरी, काही काव्यपंक्तीत दहा शब्द तर काहीत दोनच! एक गोष्ट माझ्या लक्षात आली की तुम्ही पंडिती आकाराचे शब्द मात्र योजलेले नाहीत हे छानच! तुमच्या एकूण शैलीची ओळख माझ्या लक्षात आली. या आणि

आणखी काही गुणविशेषणांतून तुमच्या कवितेचा एकूण आकृतिबंध निर्माण झाला व मग या साधनात तुम्हांला सांगायचा आशय, काव्यांश साठवला. आता असा आकृतिबंध तयार करायचा तर अंकशक्तीला तर टाळता येणार नाही. अशा प्रकारे आशय साठवण्यासाठी साधन तर तयार झाले. आता या आशयाला अंकस्पर्श होणार नाही, अशी अटकळ मी बांधत होतो. तेवढ्यात लक्षात आले की साहित्य समीक्षकांनी माझे हे हक्क केव्हाच काढून घेतले आहेत. एखाद्या साहित्यकृतीत 'आशय कमी पडतो,' तर दुसऱ्या कृतीत 'आशयाला येथे घनता लाभलेली नाही' तर तिसऱ्यात 'आशयाला आकार आलेला नाही' अशी अंकस्पर्श लाभलेली वाक्ये हे समीक्षक सहजपणे योजतात. 'आशय' या घटकाशी अंकाचे काहीतरी नाते असावे, असे समीक्षकांना वाटत असावे; पण नेमका कोणता अंक हे सांगता येत नसावे. ही अपूर्णता आपण सहज समजू शकतो. भाषासाहित्यात असे अनेक शब्द आढळतात. उदाहरणार्थ, माणसाला अनुभवाला येणारी विषण्णता, सहानुभूती, अनुकंपा, आकर्षण, एकाकीपणा, विफलता, नैराश्य इत्यादी! खरेतर अशा संज्ञांमध्ये आपल्याला काहीतर तर तमभाव अनुभवाला येतो का हे ताडून पाहावे. कमी-जास्त. थोडा-फार, अधिक-उणे अशा शब्दांचा वापर करून हा तर-तमभाव आपण व्यक्त करीत असतो. याचाच अर्थ या शब्दांच्या उच्चारणात काही 'गणित-तत्त्व' अगर 'अंक-तत्त्व' दडलेले आहे. ते तत्त्व 'फजी' स्वरूपात असल्याने सहजपणे आज सांगता येत नाही. आधुनिक गणित-ज्ञानात नवीन उपक्षेत्रांची भर पडत आहे. त्यात न्यूरल नेट्स (Neural Nets) न्यूमरिकल अँड कॉम्प्युटेशनल मॅथेमॅटिक्स्, मॅथॅमॅटिकल लिंग्विस्टिक्स अशा उपविषयांचा समावेश होतो. यामुळे लवकरच असे फजी-शब्द अंकभक्त होतील.

भाषा विज्ञानातील वाक्यरचना (सिंटॅक्स), शब्दांच्या अर्थाचा उगम आणि विकास (सेमँटिक्स), संगणकीय भाषांतर शास्त्र (मशीन ट्रान्सलेशन), भाषण-वर्गीकरण, वैशिष्ट्यीकरण व विश्लेषण (स्पीच ॲनलिसिस), भाषा उच्चारण शास्त्र (फोनेटिक्स्), व्याकरण या सर्व घटकांत आता गणितीच्या पद्धतीचा वापर होत आहे. भाषेतील प्रत्येक ध्वनी लहरीयुक्त असल्याने त्या मोजता येतात. गायन-कलेत या लहरी एका गणितीय श्रेणीने उच्चारल्या की गायन मधुर होते. गायकी विद्येचा व गणित विषयाचा जवळचा नातेसंबंध असल्याचे इ०स०पूर्व पाचव्या शतकात ग्रीक गणिती पायथॅगोरसने अधोरेखित केले होते. ख्यातनाम भारतीय गायक श्री० भातखंडे यांनाही या नात्यासंबंधी माहिती होती असे त्यांच्या ग्रंथात नमूद केलेले आहे. कलाक्षेत्र, सौंदर्यशास्त्र अशा विषयांचा गणिताशी (म्हणजेच अंकनिर्मितीशी) जवळचा संबंध असल्याचे समजून घेणे तसे सोपे आहे.





अनुक्रमणिका

यासाठी आपण रांगोळीचे उदाहरण घेऊ. सकाळी दारापुढे काही महिला आजही रांगोळी काढताना आढळतात. काही घरांतून सणासुदीच्या निमित्ताने जेवणाच्या पानाभोवती रांगोळी काढतात. या रांगोळीतील एखादा छान दिसणारा कंस निवडावा व त्याचा फोटो काढावा. मग त्या कंसाला आलेख-कागदावर असलेल्या अक्ष (x-axis, y-axis) रेषांच्या सोयीने चिकटवावा. आता हा रांगोळीचा भाग गणितातील एक वक्र आलेख (curve) असेल व त्याला मिळालेला अक्षांचा आधार असल्यामुळे त्यातील प्रत्येक बिंदूला (क्ष, य) किंवा (x, y) हे अंक कोऑर्डिनेट्स मिळतील. या वक्र आकारावरील प्रत्येक बिंदूला (क्ष, य) असे दोन अंक मिळतात. हे सर्व अंक अर्थातच एकमेकांचे नातेवाईक असतात. हे संबंध त्या वक्र चित्राचे गणितीय समीकरणाने लक्षात घेता येतात.

गायनातील एखादा आलाप याच प्रकारच्या पद्धतीतून रेखांकित करता येईल तर एखादी नृत्यांगना आपल्या पदन्यासातून जे वैभव अनुभवाला आणून देते ते एकूण चित्र म्हणजे तीन परिमितीत काढलेली रांगोळीच! येथे रांगोळी, गायन अथवा नृत्य यांचे अंकांकन करण्याची कृती सुचवली आहे.

**लेखनाचे गणित**

लेखनाचा हेतू मूलत: वाचकांचे मनोरंजन करणे, प्रबोधन करणे आणि ज्ञाननिर्मिती करणे या निमित्तात दडलेला असतो. ललित लेखनातून बरेचसे मनोरंजन, काहीसे प्रबोधन व अल्प ज्ञानवर्धन होत असते तर गंभीर साहित्य-लेखन (उदा० समीक्षालेखन), निबंध, संशोधनलेख, शास्त्रीय स्वरूपाच्या ज्ञानवर्धन लेखनातून होत असते. या लेखनाच्या निर्मितीत अनुभवाने काही संकेत निर्माण झाले आहेत, रूढीही पडल्या आहेत. या प्रकारचे लेखन प्रत्येक लेखकाला लाभलेल्या, आवडलेल्या शैलीतून होत असते. ही शैली म्हणजे निर्मात्याचा शब्दन्यास किंवा शब्दलालित्य होय. अखेरीला लेखकाला जे सांगायचे आहे ते वाचकांना स्पष्ट समजले पाहिजे, त्याचा दीर्घ आस्वाद घेता यायला हवा. या वाचनातून शक्यतर वाचकच नंतर लेखक-निर्माता व्हावा ही अपेक्षा करता यावी. आपल्या विचारांची उतरंड शब्द-योजकतेतून करताना वाचकांचा समज-निर्देशांक लक्षात घेणे गरजेचे ठरते. वर केलेल्या निर्देशनातून आपण सहजपणे गणिताच्या किनाऱ्याजवळ येऊन ठेपतो. मग लेखकाला आपल्या लेखनाची धूसरता कमी करण्यासाठी शब्दरचना, वाक्यरचना, लेखनातील मुद्द्यांची जुळवाजुळव करावी लागते. लेखनात दाटलेली-दडलेली धूसरता कमी करावीशी वाटते. आपल्या लेखननिर्मितीत गुंतलेली ही धूसरता एखाद्या गणितीय निर्देशक अंकाने समजते का? असा प्रश्न लेखक स्वत:ला विचारतो. या प्रश्नाचे उत्तर 'होय' असे

आहे. या निर्देशांकाला 'Readability Index' असे म्हणतात. हा निर्देशांक कसा काढायचा याचा ऊहापोह मी या लहान लेखात करत नाही. पण वेगवेगळ्या पद्धती वापरून असे निर्देशांक आता संशोधन करून निर्माण केले गेले आहेत. कायदे-कानूसंबंधी केलेले लेखन नेहमीच अवघड तर बरेच वेळा सामान्य वाचकाला किचकट वाटते, तर काही लेखकांची निर्मिती अगदीच फुसकट, बालबोध स्वरूपाची (लहान वाक्ये, सोपे शब्द) किंवा अंगावर गारा पडल्यासारखे वाटणे या थाटाची वाटते. असा निर्देशांक काढण्यासाठी वाचकाचे वय, त्याचे शिक्षण व सांगावयाचा विषय हे मुद्देही लक्षात घ्यावे लागतात. साहित्यातील 'धूसरता गुणक' काढण्यासाठी आता खाली दिलेल्या पद्धती सर्वमान्य झाल्या आहेत.

(क) फॉग इंडेक्स (ख) फ्राय रीडेबिलिटी टेस्ट (ग) पॉवर्स-समर-कार्ल फॉर्म्युला (घ) मॅकलॉलिन 'स्मॉग' फॉर्म्युला (च) फ्लेश रीडिंग ईझ. [(क) Fog Index (ख) Fry Readibility Test (ग) Powers-Summer-Kearl Formula (घ) McLaughlin 'SMOG' Formula (च) Flesch Reading Ease.] यांपैकी काही कसोट्या आंतरजालावर मिळतात.

सर्वसाधारणपणे जगातील प्रमुख भाषांना वर नोंदलेल्या कसोट्या उपयुक्त ठरतात. मराठी (अगर अन्य भारतीय भाषा) भाषेत अशी कसोटी केली गेल्याचे प्रस्तुत लेखकाला माहीत नाही. भाषेच्या अंतर्गत रचनेमुळे या प्रकारच्या कसोट्या तयार करताना काही बदल करावे लागतील. लेखकाने लिहिलेला एखादा परिच्छेद अवघड, कठीण अगर किचकट आहे का? किंवा तो बालबोध, अतिसामान्य अगर फोलपट आहे का? या पातळ्या ठरवल्या तर साहित्यात उत्तम लेखनाची भर पडेल. गणितीय पद्धती या प्रकारच्या कसोट्यांच्या आधाराने साहित्याचा स्तर उंच करू शकतील.

साहित्यात गणिती भूमिका किती असू शकते. याचे वर्णन येथे थोडक्यात केले आहे. गणिती भाषाविज्ञान (मॅथेमॅटिकल लिंग्विस्टिक्स) हा आता एक व्यापक विषय काही विद्यापीठांतून शिकवला जातो व त्याविषयी अनेक ग्रंथ उपलब्ध आहेत. काही भाषावैज्ञानिक गणिताची उपयोजितता वाढवत आहेत. उदाहरणार्थ, गेराल्ड व्हुएट (Gerald Huet) याचा एक शोध लेख (कॉम्प्युटेशनल प्रोसेसिंग ऑफ संस्कृत लँग्विज)' माझ्या वाचनात नुकताच आला. गेल्या दोनतीन दशकांत अंकीकरण तंत्रज्ञान (डिजिटल टेक्नॉलजी) या विषयावर ऐकले, बोलले, लिहिले जात आहे. डिजिटल कॅमेरा, डिजिटल वॉशिंग मशीन, टीव्ही, रेडिओ या प्रकारच्या यंत्रांच्या रचनेत या तंत्रज्ञानाचा व्यापक उपयोग केला जातो. याविषयीच्या





अनुक्रमणिका

जाहिराती वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होतात. संगणकावरून फोटो दूर अंतरावर पाठवता येतात. ध्वनीची रवानगी दूरदेशांतील लोकांपर्यंत तत्काळ होत असते. आपल्या मोबाईलवरून लघुसंदेश (SMS) पाठवून क्षणार्धात हजारो मैल दूर असणाऱ्या संवर्धित व्यक्तीला सहजपणे दिले/सांगितले जातात. मोबाईलवरील पडद्यावर अक्षरे (SMS) उमटतात. पण ही अक्षरे दूर ठिकाणी प्रवास करत नाहीत. तर त्यांचे अंकांत रूपांतर होऊन ते अंक प्रवास करतात व हा संदेश संबंधित व्यक्तीला त्याच्या मोबाईल यंत्रावर अंकाचे शब्दात रूपांतर होऊन डी-कोड (De-code) स्वरूपात वाचता येतो. आता ही क्रांती ग्रंथप्रकाशने, वृत्तपत्रे, नियतकालिके, संगीत, छायाचित्रे येथपर्यंत पोचली आहे. ही सर्व व्यवस्था आपल्या रोजच्या जीवनव्यवहारात आता रुळून गेली आहे.

अंकीकरण तंत्रज्ञानात द्विमित अंक पद्धती (बायनरी कोड) म्हणजेच दोन चिन्हे ० व १ योजले जातात. या अंकपद्धतीचा शोध १६२९ सालचा! पण विसाव्या शतकात या अंकपद्धतीचे तंत्रज्ञान व्यापकपणे उपयोजित झाले व संगणकीय तंत्रज्ञ (कम्युनिकेशन टेक्नॉलजी) माहिती तंत्रज्ञान (इन्फर्मेशन टेक्नॉलजी), (डिजिटल टेक्नॉलजी) ही शास्त्रे गेल्या दोन-तीन दशकांत विज्ञानाचा भाग बनली. या क्रांतीमुळे जग आता लहान वाटू लागले व 'अंतर' हा घटक कमालीचा क्षीण झाला. आता e-book प्रकाशने निघून सर्व ग्रंथनिर्मितीच्या व्यवसायात, व्यवहारात क्रांती होणे अपेक्षित आहे. द्विमित अंकपद्धती व इलेक्ट्रॉनिक्सचा शोध यांच्या माध्यमांतून भाषा आणि जीवन या क्षेत्रांना नवीन परिमाणे मिळत आहेत. संगणक, इलेक्ट्रॉनिक्स, अन्य विज्ञाने, शास्त्रे व गणित यांच्या सहभागांतून जीवन, संस्कृती यांचा चेहरामोहरा बदलत चालला असल्याचे सर्व सुशिक्षित नागरिकांना आता प्रकर्षाने जाणवू लागले आहे. हे व्यवस्थापन कसे घडत आहे, त्याचे एक उदाहरण खाली नोंदतो.

काही काळापूर्वी, आजारी झाल्यावर मला तज्ज्ञ डॉक्टरांकडे उपचारासाठी जावे लागले. त्यांनी तपासून सहा-सात प्रकारच्या शारीरिक चाचण्या करून घेण्याचे सुचवले. प्रयोगशाळेत जाऊन मी ते अहवाल मिळवले. हे अहवाल अंकांनी भरलेले होते; तर एका अहवालात एक आलेख (ग्राफ) होता. हा अहवाल-संच मी जर प्रयोगशाळेत दोन तास आधी किंवा नंतर लवकर गेलो असतो तर वेगळाच असता. डॉक्टर मला म्हणाले, "सुमारे १,२०० चाचण्या आता शास्त्रज्ञांनी शोधल्या आहेत. पण त्यांपैकी बहुतेक प्रयोगशाळांतून सुमारे २०० चाचण्या प्रत्यक्ष केल्या जातात. आपले सर्व शरीरच हे वेगवेगळ्या अंकांचे एक कोठारच आहे. शरीरात रेचलेले हे अंक काही रसायनांनी व साधनांनी अंकात बंदिस्त करता

येतात असे लक्षात आले. या प्रकारच्या अंकयुक्त शारीरिक चाचण्यामुळे डॉक्टरांचे काम बरेच सुलभ झाले आहे.

वैद्यकीय क्षेत्रात बरीच नवीन साधने (इन्स्टुमेंट्स) उपयोजित होताना आता आढळतात. उदा० थर्मामीटर, ग्लुकोमीटर, डायलिसिस मशीन, रक्तदाब निर्देशक इत्यादी! ही साधने आता सर्वच ठिकाणी आढळतात. यांच्या निर्मितीमध्ये मूळ विचार असतो तो म्हणजे हे साधन कशासाठी वापरायचे आहे. त्याची गरज काय? साहजिकच या मूळ-निर्मिती विचारात गणिती विचार दडला आहे. वर नोंदलेली साधने अनुक्रमे तापमान मोजण्यासाठी, रक्तशर्करा मोजण्यासाठी, रक्तशुद्धीसाठी व रक्तदाब मोजण्यासाठी निर्माण झाली. काहीशा विचारानंतर लक्षात येते की अशा साधननिर्मितीत गणित, मूलभूत विज्ञान, अभियांत्रिकी आणि तंत्रज्ञान या चार ज्ञानशाखा त्याच अनुक्रमाने उपयोजिलेल्या असतात. उदाहरणार्थ, दाढी करण्याचे पाते या चार निर्मितीच्या पायऱ्या क्रमाने उत्तीर्ण होते. थोडक्यात, प्रत्येक साधनाची सुरुवात नेहमीच गणित विचारातून होते. (उदा० दाढीच्या पात्याला किती धार हवी?) आज निरनिराळ्या कार्यक्षेत्रांत उपयुक्त ठरणारी लक्षावधी साधने गणितीय-अंक-विचारातून निर्माण होत आहेत.

काही वेळा भूमितीय आकृत्या अंक समुच्चयांपेक्षा वेगळ्या आहेत, असे वाटते. भूमितीय सर्व व्यवहार अंकांनी होत असतो. आपण आलेख-पृष्ठावर त्रिकोण काढला की हे नाते सहज लक्षात येते. भूमिती या विषयात आता अनेक दिशांनी भर पडली आहे. पलंगावर अंथरलेली चादर समपातळीवर असल्याने त्यावर छापलेल्या रेषा, एखादे गुलाबाचे फूल-नक्षी आपल्याला स्पष्ट दिसते व त्यामुळे चादर दिसतेही छान! समपातळीवर आखलेल्या आलेख-पृष्ठावर ही चादर पसरली तर अनंत अंक समुदयाचे दर्शन आपल्याला घडते. पण थंडीच्या रक्षणासाठी ही चादर रात्री अंगावर घेतली की चादरीची भूमिती बदलते. रात्री वारंवार आपल्या झोपेच्या लोळण्यातून तर अनेक आकार या चादरीतून घडत जातात. समपातळीवर असलेली ही भूमिती त्यामुळे तीन परिमितीत परावर्तित होते. या चादरीवर छापलेली नक्षी-रेषा त्यांचे आकारमान बदलतात. नक्षी-रेषा मोडतात, वक्र होतात; पण त्या मोडून पडत नाहीत. त्यांच्यात अस्तित्वात असलेले सातत्य (कंटिन्युइटी) बदलते; पण ते नष्ट होत नाही. खरेतर, छताला सीसीटीव्ही बसवून घेतला तर सबंध रात्रीत आपल्या शरीरामुळे घडलेली, विस्कटलेली भूमिती आपण आता सहज अनुभवू शकू. अशी ही अंकसृष्टी आपल्या ज्ञानात भर घालत जाते. ''माणसाच्या संसाराची, देशाची, समाजाची, अर्थकारणाची घडी विस्कटली आहे,'' असे म्हणतो त्याचा अर्थ या व्यवस्थेत पडलेल्या

अंक-सुरकुत्या आहेत. चादरीवरील विस्कटलेली नक्षी कधीच मोडत नाही. थोर व्यक्ती ही घडी स्वकौशल्याने नीट बसवतात. खरेतर. या व्यक्तीला अंकश्रेष्ठ असे म्हणू या!

शाळेत असताना 'पाय' ($\pi$) हा अंक ओळखीचा झाला. या 'पाय'चे मूल्य सुमारे २२/७ = ३.१४ असल्याचे शिक्षकांनी सांगितले. आपल्याला 'पाय' त्रिज्येच्या वर्तुळाचा परीघ २ $\pi\mu$ असतो. त्याचे क्षेत्रफळ $\pi\mu^{२}$ असते. तर त्यापासून होणाऱ्या गोलाचे घनफळ ४/३ $\mu\pi^{३}$ एवढे असते. असे गणितीय नियम शिक्षकांनी घोकून घेतलेले असतात. 'पाय' ही परिमेय संख्या नाही तर ती वास्तव संख्या (रियल नंबर) आहे. हे ज्ञान महाविद्यालयात मिळाले. म्हणजे 'पाय' = ३.१४ ही संख्या अंदाजाने आहे. याचाच अर्थ ३.१४मध्ये अंशचिन्हापुढे अनंत संख्या आहेत. भागाकार पद्धतीने मग या पुढील संख्या शोधण्याची शर्यत अंकप्रेमी माणसांना लागली. आल्बर्ट आईनस्टाइनचा जन्म १४ मार्चचा म्हणून अमेरिकेत ३/१४ ही संख्या त्याच्या नावाने ओळखली जाते. हिचकॉकने 'पाय' या संख्येवर सिनेमा काढला. १४ मार्च हा 'पाय' दिवस म्हणून आता मानला गेला आहे.

'पाय'चे मूल्य : 'पाय' = ३.१४१५९२६५३५-----

असे अधिक-अधिक अंदाजाने उलगडले जाऊ लागले. संगणक यंत्र येण्याच्या अगोदर जिज्ञासूंनी कुतूहलापोटी अंशापुढील तीन लक्ष अंक शोधले. संगणकाच्या आताच्या अवतारामुळे अंशापुढील अंक मोजणे शक्य झाले. त्यांची संख्या आता १०००,०००,०००,० दहा ट्रिलियन $(१०)^{१३}$ एवढी झाली आहे. ही संख्या केवळ वाचायची तर एक वर्षाचा काळ लागेल (रोज २४ तास). अकिरा हराकुची या माणसाने यापैकी पहिले एक लाख अंक (२००६ साली) पाठ म्हणून दाखवले.

'पाय' संख्येचा शोध कधी लागला असा प्रश्न विचारला जातो. ज्या दिवशी ब्रम्हांडात ग्रह-तारे जन्माला आले त्या दिवशी 'पाय' अंकाचा जन्म झाला असे म्हणावे लागेल. कारण सर्व ग्रह-तारे आकाराने गोल आहेत. गोलाई जेथे जेथे अनुभवाला येते; तेथे 'पाय' या अंकाचे अस्तित्व असणारच. आकाशातला चांदोबा अगदी लहान मुलालाही आकर्षित करतो तो त्याच्या गोलाईमुळे. मला तर जेवायचे ताट, वाटी, कप-बशी, पेला, तांब्या, पानात वाढलेली भाकरी अगर फुलका, फळीवरचे डबे, बरण्या अशा कितीतरी वस्तूंमध्ये 'पाय'चे दर्शन होते. या 'पाय'मुळे गोल वस्तूला साधर्म्य-तत्त्व (सिमिलॅरिटी तत्त्व) काठोकाठ लाभले आहे. म्हणूनच हा 'पाय' अंक स्त्रियांच्या सर्व आभूषणांतून पुरेपूर वापरला गेला. अंकविश्वात असे कितीतरी अंक अशी गुणवत्ता सांभाळून आहेत. अंकांची एकूण दाटी आपल्या शरीरात इतकी रुतून राहिली आहे, याला निसर्गदत्त कारण आहेच, ते खाली नोंदतो.





अनुक्रमणिका

आपल्याला (अगदी अशिक्षितालाही) गणित विषय कोणत्या वयात समजू लागतो? असा प्रश्न एकदा विचारला गेला. जसजसे वय वाढते, तसतसे आपली गणिताची उमज वाढत जाते हे विधान सहज सिद्ध करता येईल. पण किती लहानपणी गणिताची जाण मुलाला होते? या प्रश्नाचा माग शास्त्रज्ञांनी घेतला. अगदी एक वर्षाच्या मुलाला एक चॉकलेट व दोन चॉकलेटमधला फरक कळतो व तेही काहीही न शिकवता! पण आपण सर्व जण एक प्रयोग घरी सहज करू या. तो असा –

घरातील नवजात (एक महिना वयाचे) बालक तरतरीत अवस्थेत असताना (पोट भरल्यावर व झोपेनंतर) बाळाचे लक्ष प्रथम वेधून घ्यावे व त्याच्या डोळ्यांपुढे हाताची जुळलेली दोन बोटे तीन वेळा सावकाश फिरवावीत. नंतर त्वरेने (दोनाऐवजी) तिने जुळलेली बोटे तशीच फिरवावीत. लक्षपूर्वक पाहिले तर बाळाने डोळे मिचकावलेले असतात. बाळाला अंकभेद ठाऊक झाला असल्याचे लक्षात येते. त्याला तो समजला आहे, याची पावती म्हणजे त्याच्या डोळ्यांत उसळलेली चमक! याचा अर्थ नवजात मूल गणित - अंकज्ञान घेऊनच जन्माला येते. ही विद्या शिकल्या-शिकवल्यानंतर वाढते एवढेच!

कुंवरजी तुम्ही ज्येष्ठ कवी आहात. मलाही कविता अतिशय आवडते. तुमच्या विधानाचा मला प्रतिपक्ष करायचा नाही. खरेतर, तुम्हीही अंकांची प्रशंसा, संभावनाच केली आहे. मी त्यात थोडी भर घातली एवढेच! विज्ञानाच्या नवीन घडणाऱ्या झंझावातात अंकांचे तांडव होत जाणारच! खरेतर, आपण सर्व जण अंकावरणातच राहत असतो. काही लोक त्याला वातावरण म्हणतात एवढेच. म्हणून आपण आता असेही म्हणू या ''हम आदमी नहीं अंक हैं!''

■



# भारतातील भाषांतर-उद्योगाचे दारिद्र्य

**अशोक रा० केळकर**
**(भाषांतर : कल्पना कुलकर्णी)**

भाषांतर-उद्योगात माझ्यासारखी व्यक्ती अनेक परींनी खूप रस घेऊ शकते. माझ्या स्वत:च्या अनेक लेखांची भाषांतरे झाली आहेत, माझ्या वाचनातही अनेक भाषांतरांचा समावेश आहे आणि मी स्वत:ही बऱ्याच लेखांची (त्यातले काही माझेच) भाषांतरे केली आहेत. अशा रीतीने भाषांतर-उद्योगाचा कर्ता व उपभोक्ता असलेल्या माझ्यासारख्या व्यक्तींना आपल्या देशातील भाषांतर-उद्योगाच्या दारिद्र्याचे फार दु:ख वाटते. (याचा अर्थ असा की,) आपल्या गरजा भागविण्याइतकी भाषांतरे होत नाहीत; आणि जी होतात त्यांची गुणवत्ता फारशी बरी नसते. जर काही चांगली भाषांतरे असली तर त्यांच्या ग्राहकांना त्यांची कदर नसते आणि कदाचित त्यामुळे त्यांचे उपभोक्ते आणि कर्ते यांनाही त्यांची पर्वा वाटत नाही. त्यामुळे या क्षेत्रात बेपर्वाईचेच राज्य चालते; कारण त्यात प्रतिष्ठा नसते किंवा प्रमाणभूत गुणवत्तेचा आग्रह नसतो आणि त्यामुळे ती राखायची गरजही नसते. प्रस्तुत लेखात आपल्याला भाषांतर-उद्योगातील या दुहेरी उणिवांचा विचार करायचा आहे; प्रतिष्ठेचा अभाव आणि प्रमाणभूत गुणवत्तेचा अभाव.

अलीकडच्या दशकांत झालेल्या जनगणनेनुसार भारतात दोन किंवा अधिक भाषा जाणणाऱ्यांचे प्रमाण अतिशय मोठे आहे. असे असतानाही येथे अनुवाद-कृतीची इतकी कमतरता असावी, ही गोष्ट आश्चर्य वाटण्याजोगीच आहे. संपन्न अनेकविध पैलू व प्रदीर्घ इतिहास असलेल्या सांस्कृतिक परंपरेचा अभिमान बाळगणारा आपला देश! तिथे असे अनुवाद-दारिद्र्य का असावे? तेही प्रदीर्घ काळ टिकलेले? ह्या वास्तवाचे स्पष्टीकरण तरी एखाद्याने कसे करायचे?

**अनुवादाला प्रतिष्ठा नाही**

अनुवादाला प्रतिष्ठा देण्याची एवढी अनिच्छा का असावी? इतकी की बऱ्याचदा अनुवादकाच्या नावाचा उल्लेखही टाळण्याकडे लोकांचा कल दिसून येतो. दिलेली संहिता ही अनुवादित संहिता आहे, ही वस्तुस्थिती हेतुपुरस्सर दुर्लक्षिली जाते.

संस्कृत आणि पाली भाषांतील लेखन-कृतींचे अनुवाद कित्येक शतकांपूर्वीच भारताच्या पूर्वेला चिनी आणि इतर भाषांत झाले होते ह्या गोष्टीचा भारतीयांना अभिमान वाटतो. तसाच अभिमान भारताच्या पश्चिमेला संस्कृत साहित्याचा अनुवाद अरेबिक, लॅटीन





अनुक्रमणिका

आणि इतर भाषांत झाल्याचाही वाटतो. पण उदास करणारी वस्तुस्थिती अशी की, चिनी किंवा पर्शियन वाङ्मयाचे संस्कृत किंवा इतर भारतीय भाषांतील अनुवाद क्वचितच पाहायला मिळतात. एकप्रकारे हा आपल्या आत्मसंतुष्टतेचा पुरावाच म्हणायला हवा. जगाला देण्यासारखे आपल्याकडे खूप आहे; पण आपल्याला देण्यासारखे जगाकडे मात्र काहीच नाही, असाच दृष्टिकोण आपण आजपर्यंत स्वीकारला आहे. अल्-बीरूनी (१०-११वे शतक) नावाचा अरब खगोलशास्त्रज्ञ आणि गणितज्ञ हा ह्या भारतीय मानसिकतेचा प्राचीन साक्षीदार मानता येईल. भारतातील आपल्या प्रवासावर आधारित भारताबद्दलच्या पुस्तकात ('तारीख अल् हिन्द' खंड १) त्याने सर्व परदेशी गोष्टींबद्दलचे भारतीयांची नावड आणि त्यांची पराकाष्ठेची अल्पसंतुष्टता ह्यांचा उल्लेख केला आहे. मजा म्हणजे त्याच पुस्तकात त्याने असाही तर्क नोंदवला आहे की, भारतीयांचा तुटकपणा आणि आत्मकेंद्रिततेकडे असलेला कल हा कदाचित त्यांचा नेहमीचा स्वभाव-विशेष नसावा. बौद्ध-जैन-लोकायत बंडानंतर झालेल्या ब्राह्मणांच्या सुधारणाविरोधी चळवळीचा परिणाम म्हणून भारतीयांच्या रक्तवाहिन्या इतक्या ताठर झाल्या असाव्यात.

भारतीयांच्या आत्मसंतुष्टतेला अंतर्गत दृष्टिक्षेपाचा एक पैलू आहे. भारतीय लोक केवळ परदेशी गोष्टींबद्दलच उदासीन आहेत असे नाही. भारतांतर्गत त्यांच्या स्वत:च्या प्रदेशात सहज उपलब्ध नसलेल्या गोष्टींबद्दलही ते तितकेच उदासीन आहेत. भारत हा अगदीच छोट्या वस्त्यांचा नसला तरी खेड्यांचा देश आहे, (हे विशेषत: चौथ्या ते आठव्या शतकातील मोठ्या नगरांच्या अस्तानंतरच्या काळाचे वैशिष्ट्य राहिले. सातव्या शतकातील ह्यूएन त्संग हा चिनी यात्रेकरू ह्याची साक्ष देतो.) आपल्याच गावाबद्दल जवळिकीची भावना असणे, त्याच्याशी मित्रत्व, आपुलकीचे नाते असणे साहजिकच आहे. पण ह्याची एक उलट बाजू अशीही होऊ शकते की गावाबाहेरच्या लोकांबद्दल अगदी अविश्वासाची नसली तरी परकेपणाची भावना निर्माण होते. विशेषत: नगरांतून किंवा अन्य प्रांतांतून आलेल्यांबद्दल भारतीय आत्मसंतुष्टतेचा हा स्थानिक पैलू मानता येईल. आपल्या स्थानिक जीवनशैलीवर आपण इतके खूष असतो की इतर कुठल्याही जीवनपद्धतीबद्दल आपल्या मनात साधी जिज्ञासाही निर्माण होत नाही. पुनरुज्जीवन काळानंतर (आत्मसंतुष्टतेने ह्या काळाला Indian Renaissance असे म्हटले जाते; पण वास्तवात तसे काही नव्हते.) ह्या दोन पदरी आत्मसंतुष्टतेला कसलाच धक्का बसला नाही अशा परिस्थितीत कोण विचार करणार अनुवादाचा? अनुवादांचे लाभार्थी उपभोक्ते किंवा कर्ते बनण्याची आवश्यकता तरी कुणाला जाणवणार?





अनुक्रमणिका

ही परिस्थिती बदलण्यासाठी काही उपाय शक्य आहेत. अनुवादकांना पुरस्कार, आर्थिक साहाय्य किंवा स्वामित्वासाठीची रक्कम देऊ करणे हे उत्तेजनाच्या दिशेने एक महत्त्वाचे पाऊल ठरू शकते. पण मुळातील भारतीय मानसिकता बदलण्यासाठी ते पुरेसे नाही. कबीर सन्मानाचे मानकरी गो०वि० करंदीकर ह्यांची अनुवादाबद्दलची भूमिका विचारात घेण्यासारखी आहे. मराठीतील एक मान्यताप्राप्त लेखक म्हणून इतर भाषांतील किमान दोन किंवा तीन साहित्यकृतींचे मराठीत भाषांतर करणे हे त्यांना आपले कर्तव्य वाटते. आणि खरोखरच त्यांनी शेक्सपीयरचे 'किंग लिअर', ॲरिस्टॉटलचे 'पोएटिक्स', आणि गटेचे 'फाउस्ट' ह्यांची मराठी भाषांतरे केली. ज्ञानेश्वरांनी तेराव्या शतकात लिहिलेल्या 'अमृतानुभव' ह्या तत्त्वज्ञानात्मक काव्याचे आधुनिक भाषेत रूपांतर केले. खरोखरच इतर भाषांतरइच्छुकांसाठी करंदीकरांचे हे काम म्हणजे प्रेरणास्रोतच ठरावेत. भाषांतराचे उपभोक्ते आणि लाभार्थी ह्या दोघांनीही ही जाणीव सतत ठेवली पाहिजे की भाषांतर, अनुवाद हे काही पैशाच्या मोबदल्यात कसलेही कंटाळवाणे काम करायला तयार असणाऱ्या भाडोत्री लेखकांचे काम नाही.

शाळा-महाविद्यालयांतील मराठी वाङ्मयाच्या अभ्यासक्रमात भारतीय व परदेशी भाषांतील पुस्तकाच्या मराठी भाषांतराचा समावेश झाला पाहिजे. त्यामुळे मराठीचे विद्यार्थी व शिक्षक ह्या दोघांच्याही जीवनविषयक आणि साहित्याविषयीच्या जाणिवांचे क्षितिज विस्तारायला मदतच होईल. हीच गोष्ट इतर भारतीय भाषांतील व इंग्रजीतील साहित्याच्या अभ्यासकांनाही लागू करता येईल. ह्या उपायाने भाषांतरांची संख्या वाढवण्यासाठी एक प्रयोजन उपलब्ध करून देता येईल.

एम०फिल० किंवा एम०लिट० पदवी मिळण्यासाठी सादर कराव्या लागणाऱ्या प्रबंध/निबंधाला पर्याय म्हणूनही भाषांतराचा उपयोग करता येईल. संस्कृत शास्त्रग्रंथाचे प्रस्तावना व टीपांसहित भाषांतर हा संस्कृतमधील प्रबंधाचा एक पर्याय म्हणून नेहमीच स्वीकार्य राहिले आहे. मग इंग्रजी, फ्रेंच किंवा इतर कुठल्याही 'लायब्ररी लँग्विज'मधील लेखनाचे समीक्षात्मक प्रस्तावनेसह सटीप असे कुठल्याही आधुनिक भारतीय भाषेतील भाषांतर हा प्रबंधासाठीचा पर्याय म्हणून समाजशास्त्र, तत्त्वज्ञान किंवा वाङ्मयीन समीक्षा ह्या विषयांतील एम०ए०नंतरच्या पदव्यांसाठी का मान्य केला जाऊ नये? (लेखन असे म्हणताना मला येथे पूर्ण विस्तारित पुस्तकांपेक्षा मर्यादित लांबीचे लेख अभिप्रेत आहेत. ह्याची दोन कारणे देता येतील : असे लेखन हाताळण्यासाठी आवाक्यातले असेल, निदान प्रारंभी; आणि अलीकडे दीर्घ प्रबंधापेक्षा चांगले लेखच एखाद्या ज्ञानशाखेतील महत्त्वाच्या





अनुक्रमणिका

विकास-टप्प्याचा निर्देश करताना दिसतात.) ह्या उपायांमुळे बौद्धिक उपक्रमांचे माध्यम म्हणून आधुनिक भारतीय भाषांचे सबलीकरणही होऊ शकेल.

छोट्या सृजनात्मक वाङ्मयकृतींसाठीही ह्या योजनेचा वापर करता येईल. भाषांतराच्या खाचाखोचा जाणून घेणे हा तुलनात्मक अभ्यासातील कठीण समस्यांना जवळून भिडण्याचा एक प्रभावी उपाय आहे हे नक्की.

आज भारतीय लोक पदवी मिळवण्यावर नको तेवढा भर देताना दिसतात त्यांचे हे पदवीप्रेम एखाद्या चांगल्या कामाला का जुंपू नये? अर्थात प्रारंभापासून फार घाई न करता कामाच्या दर्जाबद्दल कुठलीही तडजोड न करण्याच्या अटीवरच. एकदम भाषांतरांचे पूरच येऊ द्यावेत, अशी अपेक्षा नाही. भाषांतराकडे एक सोपा पर्याय म्हणून पाहिले जाऊ नये. पण काहीतरी सुमार संशोधनापेक्षा भाषांतराला अधिक महत्त्व दिले जावे.

भाषांतराची प्रतिष्ठा आणि दर्जा ह्यांचा एकमेकांशी घनिष्ठ संबंध आहे. भाषांतराला प्रतिष्ठा नसेल तर भाषांतरकाराच्या मनात जबाबदारीची भावना निर्माण होणार नाही. अर्थार्जनासाठी भाषांतरे करण्यात काहीच गैर नाही; पण अशा प्रकारच्या व्यावसायिक मानसिकतेतून कामाचा अभिमान आणि जबाबदारपणाने ते करण्याची वृत्ती ह्या भावना हद्दपार होता कामा नयेत. आज मराठीतून अशी काही भाषांतरे प्रसिद्ध होताना दिसतात की त्यांना केवळ अपात्री दयाबुद्धीतूनच 'भाषांतर' असे नाव देता येईल. वेलेक आणि वॉरनच्या 'थिअरी ऑफ लिटरेचर'चे एक हिंदी भाषांतर माझ्या पाहण्यात आले. त्यामध्ये बरीचशी महत्त्वाची वाक्ये, जी भाषांतरकारासाठी आव्हान ठरू शकली असती, ती तसा उल्लेखही न करता गाळूनच टाकण्यात आली आहेत. **अशा भाषांतरकारांना निरुत्साही करून आपण त्यांना नक्कीच रोखले पाहिजे.**

**अनुवादांना दर्जा नाही**

इंग्रजी 'ट्रान्सलेशन' ह्या शब्दासाठी संस्कृतमध्ये समानार्थक शब्द उपलब्ध नाही ही गोष्ट लक्षात घेण्याजोगी आहे. 'अनुवाद' ह्या शब्दाचा सरळ अर्थ केवळ 'स्वत:च्या शब्दांत काहीतरी पुन्हा सांगणे' असा आहे. मग ते त्याच भाषेत असो किंवा दुसऱ्या कुठल्या तरी.

भारतीय भाषांत अनुवादाची मर्यादित परंपरा आहे. 'रामायण', 'महाभारत' (भगवद्गीतेचा समावेश असणारे) आणि 'भागवत' ह्या ग्रंथांना जी प्रतिष्ठा मिळाली ती **केवळ वैदिक ग्रंथांच्या तुलनेतच दुय्यम आहे असे म्हटले पाहिजे.** वैदिक ग्रंथ (ह्यांत उपनिषदांचाही समावेश होतो) हे काही निवडक लोकांनाच (म्हणजे उच्चवर्णीय पुरुष, विशेषत: ब्राह्मण) आध्यात्मिक ज्ञानाची उगमस्थाने म्हणून उपलब्ध होते. ह्याउलट रामायण, महाभारत किंवा

भागवत हे ग्रंथ सर्वांना (स्त्रिया, नीच-जातीय व जातिबाह्यांनाही) उपलब्ध होते. सर्व लोक त्यांच्याकडे आध्यात्मिक ज्ञानाचे, आदर्श व्यक्तिमत्त्वांचे उद्गम म्हणून पाहू शकत होते. म्हणूनच काही मध्ययुगीन भारतीय कवींनी ह्या महाकाव्यांचे, त्यांतील विशिष्ट प्रकरणांचे स्थानिक भाषांमध्ये अनुवाद करण्याचे काम हाती घेतले.

ह्या अनुवादांचे स्वरूप मात्र रूपांतर किंवा स्पष्टीकरणात्मक भाष्य ह्यांच्याशी मिळतेजुळते होते. कवीला घटनांमध्ये, व्यक्तिरेखांमध्ये बदल करण्याचे, काही कालबाह्य कल्पना किंवा प्रतिमा वापरण्याचे स्वातंत्र्य होते. तुलसीदासाचे 'रामचरितमानस' वाल्मीकीच्या रामायणापेक्षा समकालीन सामाजिक वर्तन-पद्धती आणि भक्तिप्रसाराच्या उद्दिष्टाशीच जास्त प्रामाणिक आहे. तुलसीदासाच्या कणाहीन सीतेचे वाल्मीकीच्या सीतेशी फारसे साम्य नाही. ज्याला 'सुयोग्य', खऱ्याखुऱ्या अर्थाने भाषांतर म्हणता येईल अशा भाषांतरांच्या जवळपास येणारे काही अनुवाद उपलब्ध आहेत; नाही असे नाही. पण ते ह्या परंपरेच्या बाहेरचे आहेत. भर्तृहरीच्या 'शतकत्रयम्'चा कुणा वामनाने सतराव्या शतकात केलेला मराठी अनुवाद हे एक असे उदाहरण होऊ शकेल.

आपल्या काळाच्या जवळ यायचे झाले तर भारतीय प्रबोधन चळवळीने प्रेरित झालेल्या बऱ्याच लेखकांनी काही श्रेष्ठ प्राचीन आणि मध्ययुगीन भारतीय कलाकृतींची तसेच काही उत्कृष्ट, लोकप्रिय इंग्रजी किंवा इतर युरोपियन वाङ्मयकृतींची आधुनिक भाषांत रूपांतरे (versions) केली. कालिदासाचे 'शाकुंतल', शेक्सपीयरचे 'ऑथेल्लो', इंग्रजी रोमँटिक काव्य, सर्व्हांटिसचे 'डॉन क्विझी', मिलचे 'ऑन द सब्जुगेशन ऑफ विमेन' किंवा अठराव्या, एकोणिसाव्या शतकातील काही लोकप्रिय ब्रिटिश कलाकृतींची मराठी **रूपांतरे पाहण्यात येतात**. ह्यांतील काही रूपांतरांत लिहिण्याच्या ओघात 'मूळ कलाकृतीशी निष्ठा' ह्या **कल्पनेचा त्याग केला गेला आहे** असे नाही, तर तिचे अस्तित्वही कुठेही जाणवत नाही. अशा परिस्थितीत अनुवाद-क्षेत्रात उत्कृष्टतेची काही डोळस परिमाणे/निकष उदयाला येतील अशी अपेक्षा करण्यात काही अर्थ नाही. असे असताना, आता असे निकष अस्तित्वात असून अनुवादांच्या लाभार्थींना, **उपभोक्त्यांना** आणि कर्त्यांना त्यांची योग्य ती दखल घेण्यासाठी कसे प्रेरित करता येईल?

प्रथम, एखाद्या अनुवादकृतीचे परीक्षण आणि तिच्यावरील टीका/समीक्षा ह्यांत भेद करण्याची गरज आहे. अनुवाद प्रक्रियेत भूमिका असणाऱ्या कुणाही एका व्यक्तीच्या दृष्टिकोणातून विचार करणारी व्यक्ती अनुवादाचे केवळ परीक्षण करू शकते. हे परीक्षण अनुवादक्रियेत सहभागी असलेला लाभार्थी, उपभोक्ता किंवा कर्ता ह्यांपैकी कुणाचाही

दृष्टिकोण केंद्रस्थानी ठेवून केलेले असू शकते. लाभार्थी हा लिखाणाचा मूळ लेखक असल्याने त्याची अपेक्षा असते की भाषांतर हे त्याच्या मूळ कलाकृतीची प्रतिकृती असावी. जणूकाही एक आत्मा आणि दोन भाषाशरीरे! भाषांतराचा ग्राहक हा अंतिम उपभोक्ता असल्याने त्याच्या दृष्टीने भाषांतर हे भाषांतर नसतेच, ती एक स्वतंत्र निर्मितीच असते. भाषांतरकर्ता हाच शेवटी टीकेचा किंवा श्रेयाचा धनी असल्याने त्याला वाटत असते की स्रोत भाषा व लक्ष्य भाषा ह्या दोन्हींवरील त्याचे भाषाप्रभुत्व सर्वांच्या लक्षात यावे. अनुवादाला जर खरोखरच न्याय द्यायचा असेल तर अनुवाद-समीक्षकाने स्वत:ला अशा आत्मकेंद्री अपेक्षांपासून दूर ठेवले पाहिजे. त्याने सर्व अनुवाद-प्रक्रियेकडे पाहण्याचा 'वैश्विक दृष्टिकोण' आपलासा केला पाहिजे. भाषांतर-समीक्षकाने भाषांतर क्रियेत अनुस्यूत असलेल्या दोन मूलभूत प्रश्नांचा विचार करणे गरजेचे आहे. भाषांतरातून नेमके काय साधायचे आहे आणि ते कसे साध्य केलेले आहे. भाषांतराचा हेतू आणि पद्धती विचारात घेतल्यानंतरच अनुवाद-समीक्षेचे **निकष** ठरवता येतील.

एका भाषेतील कथन दुसऱ्या भाषेत अनुवादित करून आपण नेमके काय साधणार असतो? आपण अशी कल्पना करू या की दोन भिन्न भाषिक व्यक्ती दुभाष्याच्या माध्यमातून एकमेकांशी संवाद साधण्याचा प्रयत्न करीत आहेत. दुभाष्याचा हेतू जर श्रोत्याला साहाय्य करण्याचा असेल तर वक्ता त्याच्या मूळ संहितेत काय सांगू इच्छितो ते आपल्यापर्यंत पोचण्याची अपेक्षा श्रोता करेल. श्रोत्याच्या अपेक्षेला प्रतिसादात्मक असे जे प्रतिकृती-वक्तव्य भाषांतरकार सादर करेल ते एक प्रकारे मूळ वक्तव्याचे विसंकेतन (decoding) असेल. (त्याला 'छायाअनुवाद' असे म्हणता येईल. संस्कृत छायेतून प्राकृत संहिता मिळवण्याचा येथे संदर्भ आहे.) भाषांतराचा हाच उद्देश असेल तर संदेश उलगडणारे, **विसंकेतन करणारे** तेच अपेक्षित भाषांतर ठरेल; पण दुभाष्याचे काम जर वक्त्याला साहाय्य करण्याचे असेल तर वक्त्याच्या अपेक्षेप्रमाणे त्याचे म्हणणे दुभाष्याने परिणामकारकरीत्या श्रोत्यांपर्यंत पोचवले पाहिजे. अशा परिस्थितीत अनुवादकाची प्रति-संहिता हे विसंकेतन नसून मूळ वक्तव्याच्या अर्थाचे श्रोत्याच्या भाषेतील पुन:संकेतन (re-encoding) असेल. (एखाद्या महत्त्वाच्या संहितेचा भावार्थ ओळखण्याच्या पद्धतीला अनुसरून त्याला 'भावानुवाद' असे नाव देता येईल.) भाषांतराचा हाच मुख्य हेतू असेल तर अर्थाचे किंवा संदेशाचे पुन:संकेतन हेच खरे भाषांतर ठरेल.

दुसरा प्रश्न असा : आपण जे साध्य करायला निघालो आहोत ते प्रत्यक्षात साध्य कसे करायचे? कुठल्याही भाषांतराला – ते खऱ्या अर्थाने भाषांतर म्हणून ओळखले जायचे असेल तर – एकाच वेळी दोन भिन्न दिशांनी आपली निष्ठा दाखवावी लागते – निष्ठा, मूळ

संहितेशी आणि निष्ठा, लक्ष्य भाषेशीही. काही उदाहरणे देऊन हा मुद्दा स्पष्ट करता येईल. समजा भाषांतरासाठीचे मूळ वाक्य हिंदी भाषेतले आहे 'उस ने सिर पर टोपी रखी और गले में माला' ह्याचे इंग्रजीतील प्रतिवाक्य होईल – He put a cap on his head and a garland in his neck. ह्या इंग्रजी वाक्याच्या पहिल्या भागात काही अडचण नाही. पण 'गले में'चे 'in the neck' हे भाषांतर समाधानकारक आहे का? विसंकेतन करणारे भाषांतर म्हणून आपण त्याची पाठराखण करू शकत नाही (संकेतन-विसंकेतन). प्रस्तुत उदाहरणात 'गले में'चे योग्य इंग्रजी भाषांतर in the neck नाही, मग ते 'round his neck' असेच असले पाहिजे. मग ते संकेतन-निष्ठ भाषांतर असो की विसंकेतन-निष्ठ.

पण कधीकधी अशीही परिस्थिती उद्भवू शकते की एकाच वेळी दोन्ही दिशांनी निष्ठा दाखवणे योग्य ठरणार नाही. कधीकधी लक्ष्य-भाषेशी असणाऱ्या निष्ठेची किंमत देऊनही मूळ संहितेशी असलेल्या निष्ठेला प्राधान्य द्यावे लागेल. अशा परिस्थितीत गरज असते ती अवलंबित भाषांतराची. अवलंबित कारण ते स्वत:ला भाषांतर म्हणवून घेते आणि मूळ संहितेवर अवलंबून असूनही लक्ष्य भाषेकडून सवलती उकळते.

मूळ संहिता : मेरी आँखें नीली हैं।

इंग्रजी प्रतिवाक्य : My eyes are blue.

काही वेळा मात्र मूळ संहितेशीच इमान हरवते आहे हे लक्षात येऊनही लक्ष्य भाषानिष्ठेला प्राधान्य द्यावे लागते. ह्या परिस्थितीतील भाषांतर हे स्वतंत्र असते. वर दिलेल्या हिंदी वाक्याचे खाली दिलेले इंग्रजी भाषांतर हे 'प्रामाणिक' पेक्षा भाषाविशिष्ट (idiomatic) आहे :

मूळ संहिता : मेरी आँखें नीली हैं।

इंग्रजी प्रतिवाक्य : I have blue eyes.

मग भाषांतराचे मूळ संहितेशी नक्की नाते काय? जर मूळ संहितेच्या आशयाशी (content) आणि रूपाशी (form) इमान हे प्रमुख प्रयोजन असेल तर अवलंबित्वाच्या प्रकारात भाषांतराचा हेतू साध्य होतो – मग संकेतन असो वा पुन:संकेतन. उलट, जर लक्ष्य भाषेच्या आशयाशी आणि रूपाशी निष्ठा हे प्रमुख प्रयोजन असेल तर विसंकेतीत वा पुन:संकेतीत भाषांतर स्वतंत्र ह्या स्वरूपातच आपला हेतू साध्य करते.

भाषांतर-समीक्षकाने वर्तमान संदर्भात भाषांतराकडून काय अपेक्षा आहेत हे प्रथम निश्चित केले पाहिजे. मूळ संहितेच्या संदर्भात घडणाऱ्या भाषिक व्यवहाराचे नेमके स्वरूप





अनुक्रमणिका

काय आहे? मूळ संहितेचा कल जर काव्यात्म सर्जनाकडे असेल तर भाषांतरकाराने त्याची पुनर्निर्मिती केली आहे काय? मूळ संहिता ही बौद्धिक उत्तेजनाकडे वळणारी असेल तर भाषांतरकाराने तो बौद्धिक कल कसा पकडला आहे? या प्रश्नांत आणखी खोलवर जाण्याऐवजी, मला वाटते, मी या प्रश्नांशी संबंधित दोन सूत्रे पेश करावीत :

(१) वाङ्मयीन कलाकृतीच्या पुनर्निर्मितीसाठी अवलंबित पुन:संकेतनाची गरज असते, तर (२) बौद्धिक लिखाणाच्या पुनर्निर्मितीसाठी स्वतंत्र विसंकेतनाची गरज असते.

भारतीय समाजात अनुवादकृतींना अधिक प्रतिष्ठा मिळायची असेल तर अनुवादाची जबाबदारी त्या क्षेत्रातील अधिकारी व्यक्तींवरच सोपविली पाहिजे. चांगल्या भाषांतरासाठी आवश्यक अशी सर्व प्रकारची गुणवत्ता भाषांतरकाराकडे असली पाहिजे. भाषांतर-क्षेत्रात काही लक्षणीय कामगिरी करू शकणाऱ्या अनुवादकांना योग्य तो मान-सन्मानही मिळाला पाहिजे.

भारतीय समाजात सर्व टीकात्मक परिमाणांचे भान ठेवून उतरून अनुवादाला पुरेशा उंच दर्जाकडे वाटचाल करायची असेल तर त्यावर पुरेशी वस्तुनिष्ठ आणि आत्मनिरपेक्ष समीक्षाही लिहिली गेली पाहिजे. (केवळ स्वार्थमूलक परीक्षणे करून दर्जाहीन भाषांतरांना आळा घालता येणार नाही.)

■

**मुद्रितशोधन**

सर्वसामान्य वाचक पुस्तकाचं मुखपृष्ठ आणि मलपृष्ठ पाहून ते वाचायचं की नाही हे ठरवतो. रसिक चोखंदळ वाचक मात्र पुस्तक उघडून चाळतो. ते चाळताना काना, मात्रा, वेलांट्या, विरामचिन्हं यांचे काटेकुटे डोळ्यांना खुपले तर मात्र पुढे जायला तो राजी होत नाही. वाचक शब्दांच्या खिडकीतून अर्थात, नंतर आशयात आणि नंतर लेखकाच्या अंतरंगात शिरतो. त्यामुळे लेखकाला शब्दांची खिडकी नेटकी ठेवून वाचकाची वाट सुकर करावी लागते. हे काम मुद्रितशोधक करतो. म्हणून लेखक आणि वाचक यांमधला तो महत्त्वाचा दुवा असतो.

- सरोजा भाटे





अनुक्रमणिका

## लेखक-परिचय

**कुलकर्णी**, डॉ० कल्पना : एम०ए० (इंग्लिश). एम०फिल०, पीएच०डी० (स्टायलिस्टिक्स), महाविद्यालय व विद्यापीठ स्तरावर अध्यापन, आता निवृत्त. पुणे विद्यापीठाचा इंग्लिश विभाग व ब्रिटिश काउन्सिल ह्यांच्या एका संयुक्त प्रकल्पात सहभाग.
टपाल-पत्ता : A-11 सूर्यप्रकाश अपार्टमेंट, मार्केट यार्ड रस्ता, पुणे 411 037;
ई-पत्ता : kalpanakulk@gmail.com; चलभाष : 98904 66067

**देव**, डॉ० सदाशिव : एम०एस्सी०, पीएच०डी०, गोवा विद्यापीठाच्या सायन्स फॅकल्टीचे डीन म्हणून निवृत्त. अमेरिकेत सात वर्षे उच्च गणिताचे अध्यापन, १२ विद्यार्थ्यांना पीएच०डी०साठी मार्गदर्शन. इंग्रजीमध्ये सहा आणि मराठीमध्ये दोन पुस्तके प्रकाशित.
टपाल-पत्ता : 502 मनीषा अपार्टमेंट, पेंडसे नगर, डोंबिवली (पूर्व) 421 201;
ई-पत्ता : sgdeo.lias@gmail.com; चलभाष : 86555 32700

**परांजपे**, (प्रा०) प्र०ना० : एम०ए०, पी०जी०डी०टी०इ०, एम०लिट०, रामनारायण रुइया महाविद्यालय, मुंबई येथे इंग्लिशचे १५ वर्षे आणि पुणे विद्यापीठात वृत्तपत्र-विद्येचे २० वर्षे अध्यापन. एक कथासंग्रह, तीन भाषांतरे, पाच संपादने, पाच सहसंपादने व एक सहलेखन अशी १५ पुस्तके प्रकाशित. ह्याव्यतिरिक्त दहा पुस्तकांत लेख समाविष्ट. संगीत नाटक स्पर्धेत लेखनाबद्दल महाराष्ट्र शासनाचे प्रथम पारितोषिक.
टपाल-पत्ता : C-216 अथश्री, पॅनकार्ड क्लब रस्ता, धनकुडे वस्ती, बाणेर, पुणे 411 045;
ई-पत्ता : pranaparanjpe@gmail.com; चलभाष : 94225 09638

**बडवे**, नीती : जर्मन भाषा व साहित्य ह्या विषयात एम०ए०, पीएच०डी०, पुणे विद्यापीठाच्या परकीय भाषा विभागातून प्रोफेसर म्हणून निवृत्त. विदेशी विद्यार्थ्यांना मराठी शिकवण्याचा अनुभव. 'लर्निंग मराठी ॲज अ फॉरिन लँग्विज', भाग १ व भाग २मध्ये लेखन.
टपाल-पत्ता : 5 संयोगिता, 897 शिवाजीनगर, पुणे 411 004;
ई-पत्ता : neetibadwe@gmail.com; चलभाष : 94223 14519

**भट**, अनघा : एम.ए. व पीएच.डी. (रशियन), व्यावसायिक भाषांतरकार. पुणे विद्यापीठाच्या परकीय भाषा विभागात रशियन भाषेचे अध्यापन, २००६मध्ये प्रकाशित झालेल्या रशियन-मराठी शब्दकोशाच्या निर्मितीत सहभाग. मराठी-रशियन-जर्मन हा त्रैभाषिक कोश प्रकाशित. 'केल्याने भाषांतर' ह्या त्रैमासिकाच्या सुरुवातीपासूनच्या संपादक.
टपाल-पत्ता : 302 जय नर्मदा सोसायटी, गल्ली क्र. 11, प्रभात रस्ता,पुणे 411 004.
ई-पत्ता : anaghab2@rediffmail.com; चलभाष : 098226 11969

बुकपोस्ट-बुकपॅकेट-त्रैमासिक

BOOK PACKET Containing Periodical

RNI No. Q-40048/83 | ISSN 2231-4059

Marathi Abhyas Parishad Patrika



मूल्य ₹ ४०/-

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

वर्ष ३५। अंक ४। दिवाळी २०१७

प्रेषकः

प्रा० आनंद काटीकर

कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद,

बी-५/१६, सनसिटी, सिंहगड रस्ता,

आनंदनगर, पुणे ४११ ०५१.

marathi.abhyas.parishad@gmail.com







